# जीवनसंग्राम

सा. बा. सनदे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# जीवन संग्राम

(नागनाथ नायकवडी यांचे चरित्र)

लेखक

सा. वा. सनदे 'राही'




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई.

# जीवन संग्राम

हुतात्मा किसन अहीर. वाळवा, नानकसिंग.
पंजाब, बाबुराव कोकाटे. पडवळवाडी,
प्रताप पाटील. रायबाग, बेंकूड वीरवली,
वालेखान सनदे. आष्टा इत्यादी सर्व
भारतीय हुतात्म्यांच्या पवित्र
स्मृतीस सादर समर्पण



**वसंतराव दादा पाटील**
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
क्रांतिवीर नागनाथ रामचंद्र नायकवडी, वाळवा, यांचे परमस्नेही.



क्रांतिवीर **नागनाथ रामचंद्र नायकवडी,** वाळवा.
बेचाळीस सालच्या, स्वातंत्र्य संग्रामाचे महाराष्ट्रातील फौजी
संघटनेचे प्रमुख सेनानी व साखर कारखान्याचे निर्माते.



**लक्ष्मीबाई**

स्वातंत्र्यास्तव, देशसेवेसाठी आपला सुपुत्र भारतमातेला
अर्पण करून, ४२ सालच्या संग्रामापासून मार्गदर्शन
करणाऱ्या स्वा. सैनिका–क्रांतिवीर नागनाथ अण्णांच्या
वीरांगणा मातोश्री, वाळवा.



लेखक–**साहेबजी बाळा सनदे**, कवि ' राही ' आष्टा.

# लेखकाचा थोडक्यात परिचय

सव्वालाखी आष्टा हे माझं गाव. माझ्या घराण्यात तीनशे वर्षांपूर्वी बालेखान हे हुतात्मा झाले. कृष्णा व वारणा नद्यांच्या खोऱ्यामध्ये काळ्या कसदार अशा भूमिवर वसलेले गाव महाराष्ट्रात सर्वात जास्त जमीन असलेलं हे खेडंगाव. लोकांचा मुख्य व्यवसाय शेती. गावात मराठी शाळा व मोडकळीस आलेलं एक हायस्कूल; तेही काही दिवसातच बंद पडलं. लगेच मी व कै. रा. वे. खैरमोडे यांनी दुसरे विद्यालय सुरू केले.

कर्मवीरांच्या सान्निध्याने मिरजवाडी (व्हॉ. शाळा) दुधगाव, वड्डथ, किन्हई अशा ठिकाणी विद्यालये सुरू करण्याची व सेवा करण्याची संधी

लाभली. सन १९६० साली कर्मवीरांच्या जीवनावर १८१ कवितांचे पहिले हिंदी खंडकाव्य 'पद्मभूषण' प्रकाशित केले. राष्ट्रकवी मैथिली शरण गुप्तानी या पुस्तकाची वाहवा केली व अभिप्राय दिला. 'क्रांति निनाद,' हिंदी-मराठी (काव्य कलशः) 'गीत गंगा' ही पुस्तके प्रकाशित करण्याचा मानस आहे.

क्रांतिवीर नागनाथ नायकवडी, वाळवा हे माझे वर्गमित्र व बेचाळीस सालच्या स्वातंत्र्य संग्रामामधील जिवलग सहकारी. त्यानी व मी हु. किसन अहीर साखर कारखान्याची योजना आखली व ती अल्पावधीत क्रांतिवीरानी पूर्ण करून दाखवली. त्यानी आजतागायत हिमालयासारखे देश कार्य केलं. गरीबांसाठी चंदनाप्रमाणे देह झिजवला. त्यांचे चरित्र भावी पिढीला मार्गदर्शक होण्याच्या दृष्टीने 'जीवन संग्राम' हे पहिलं-वहिलं मराठी पुस्तक वाचकांच्या सेवेत रुजू करीत आहे. सदरच्यां पुस्तकाची प्रथम आवृत्ती महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाने प्रकाशित करून स्वातंत्र्यवीरांचा महान सन्मान केला ही मोठी अभिमानाची गोष्ट आहे. त्यामुळे आम्ही सर्व स्वातंत्र्यसैनिक महाराष्ट्र शासनाला शतशः धन्यवाद देतो. मी जरी आज सेवानिवृत्त झालो असलो तरी क्रांतिवीरांच्या विधायक कार्यांमध्ये यथाशक्ती सेवा करीत आहे याचा मला आनंद वाटतो.

# आठवणी मंतरलेल्या दिवसांच्या

गतकाळची कथा ही नेहमीच रम्य असते. पण माझे मित्र श्री० साहेबजी सनदे उर्फ कवी "राही" यांनी लिहिलेली नागनाथ अण्णांची कथा ही केवळ गतकाळची कथा नाही; ती मंतरलेल्या दिवसांची कथा आहे, ती जीवनसंग्रामाची कथा आहे, ज्या दिवसांत महाराष्ट्राचा आणि हिंदुस्तानचा उज्ज्वल इतिहास घडविला जात होता त्या दिवसांची कथा आहे. ही केवळ नागनाथ अण्णांची कथा नाही, ती क्रांतिसिंह नाना पाटलांची कथा आहे, ती आझाद हिंद सेनेची कथा आहे, ती भारत छोडोची कथा आहे, ती माझी पण कथा आहे. आम्ही सारेच जण त्या काळात भारत छोडोच्या मंत्राने भारून आपल्या देशाला मुक्त करण्यात गुंतलो होतो. प्रतिसरकार स्थापन करून ब्रिटीश सरकारचा नायनाट करण्याच्या मागे लागलो होतो. त्यावेळच्या एकेक कथा चित्ताचा थरकाप करणाऱ्या. पण कानात वारे शिरलेल्या वासराप्रमाणे त्यावेळचे सारे क्रांतिवीर जणू साहसकथांचा सरित्सागरच निर्माण करीत होते. ८ ऑगस्ट १९४२ ला गवालिया टँकवर भरलेल्या अखिल भारतीय काँग्रेस समितीने भारत छोडोचा ठराव पास केला. त्यावेळच्या सरकारने महात्मा गांधी आणि इतर पुढारी यांना अटक केली. त्यानंतर जनतेने दिलेला लढा ही पुढे मिळालेल्या स्वराज्याची नांदी ठरली. या लढ्याची तुलना संभाजीच्या वधानंतर मराठी जनतेने मोंगलांशी सतरा वर्षे दिलेल्या

लढ्याशीच करता येईल. जनतेने ठिकठिकाणी इंग्रजी सरकारी यंत्रणेचा ताबा घेऊन एक आठवडाभर ब्रिटीश यंत्रणा नेस्तनाबूत करून टाकली. पण त्यानंतरचा पुढील लढा अधिकच बिकट होता. भूमिगत राहून पुढील चळवळ चालविणे हे आवश्यक तर होतेच पण कठीणही होते. जनतेच्या प्रक्षोभातून जनसंघटना, क्रांतिसंघटना ज्यांनी चालविली त्यात वाळवे तालुक्यातील नागनाथ अण्णा हे प्रमुख होते. महाराष्ट्रात त्या चळवळीचे जे प्रमुख होते त्यात एका पातळीवर क्रांतिसिंह नाना पाटलांसारखे लोक काम करीत होते तर दुसऱ्या पातळीवर अच्युत पटवर्धन, इमाम नावाने वावरणारे एस. एम. जोशी आणि महाराष्ट्राच्या बाहेरीलही अरुणा असफअली, जयप्रकाश नारायण, मोहनलाल गौतम, डॉ. केसकर, रामानंद मिश्र इत्यादी लोकही होते. सातारा जिल्ह्यातील रामानंद भारती तसेच श्री० रत्नाप्पा कुंभार, श्री० किसन वीर, साने गुरुजी, श्री० उत्तमराव पाटील, श्री० व्यंकटराव धोबी (अण्णासाहेब रणधीर), श्री० शिवाजीराव पाटील इत्यादी आम्ही सर्व लोक या क्रांतिकार्यात गुंतलो होतो. तुरुंग फोडून बाहेर पडणे ही अत्यंत कठीण गोष्टही आमच्यापैकी अनेकांनी चुटकीसरशी केली. त्या काळात नागनाथ अण्णा साताऱ्याच्या तुरुंगातून पळाले. हजारीबाग तुरुंगातून जयप्रकाशजी पळाले, उत्तमराव पाटील आणि लीलाबाई पाटीलही पळाल्या, नागपूरच्या तुरुंगातून ठाकूर निरंजनसिंग आणि डॉ. रामसिंग गौर पळाले. अशी कितीतरी नावे घेता येतील. नागनाथ अण्णा केवळ तुरुंगातूनच पळाले नाहीत; त्यांनी लोक जमविले, शस्त्रे जमा केली, त्याकरिता पैसा जमा केला, खजिने पण लुटले, फौजी शिक्षण देण्यास आझाद हिंद सैनिकांकडून साहाय्य घेतले, त्यातून नानकसिंगासारखे लोक जोडले आणि ब्रिटीश सरकारला नामोहरम केले. अर्थात असा उत्स्फूर्त लढा त्या काळात ठिकठिकाणी झाला. साताऱ्यात झाला, खानदेशात झाला, नागपूरला झाला, चिमूर – अष्टी – यावलीला झाला, बालियाला झाला, गोरखपूरला झाला आणि त्यात अनेकांचा कस लागला. नागपूरच्या बागडी-दांडेकरांची हिंदुस्थानी लालसेना, महाराष्ट्रातील सेवादल, विदर्भातील राष्ट्रीय युवक संघ इत्यादी अनेक संस्थांनी

त्यावेळी फार मोलाची कामगिरी केली. सातारा जिल्ह्यातील जे भूमिगत मुंबईच्या परिसरात आले त्यांना सुरक्षित ठेवण्याचे महत्कार्य सर्व श्री० भाऊसाहेब नेवाळकर, बापुराव जगताप, दगडूजी गाढवे आणि इतर अनेक मित्रांनी काहीही मागेपुढे न पहाता केले हे येथे नमूद केले पाहिजे. त्या काळात मुंबई–पुण्यासारख्या शहरातून कॉंग्रेस रेडिओही चालविला जात असे. अशा त्या क्रांतिकाळात खुलून उठलेले नागनाथ अण्णांचे व्यक्तिमत्व. पोलिसांशी त्यांनी दिलेले लढे निश्चितच अविस्मरणीय ठरतील.

क्रांतीला दोन बाजू असतात – एक विनाशक आणि दुसरी विधायक. विधायक वृत्तीचे क्रांतिकारक क्रांतीनंतर स्वस्थ बसत नाहीत. नागनाथ अण्णा त्यापैकी एक होत. देशाचा विकास व्हावयाचा असेल तर उद्योग–धंद्यांचा विकास व्हायलाच पाहिजे. क्रांतिकाळात विहिरीत गुहा निर्माण करणारे नागनाथ अण्णा स्वातंत्र्याच्या काळात साखरेचा कारखाना उभारण्याच्या मागे लागले आणि क्रांतीतील आपले सहकारी हुतात्मा किसन अहीर यांच्या नावाने त्यांनी साखरेचा कारखाना पण सुरू केला. त्यांचे दुसरे सहकारी हुतात्मा नानकसिंग यांच्या नावे त्यांनी वाळव्यास वसतीगृह सुरू केले. असा हा नागनाथ अण्णांचा इतिहास, त्यांचे मित्र आणि ४२ च्या क्रांतितील त्यांचे सहकारी साहेबजी सनदे यांनी लिहिलेला. असे इतिहास नवीन पिढीने वाचले पाहिजेत. नागनाथ अण्णा ऊर्फ क्रांतिवीर नागनाथ रामचंद्र नायकवडी यांच्या चरित्राचा हा भाग आजच्या पिढीला निश्चितच मार्गदर्शक होईल यात शंका नाही. असे स्फूर्तिदायक चरित्र लिहिल्याबद्दल मी श्री० साहेबजी सनदे यांचे अभिनंदन करतो.

विजया दशमी
१६ ऑक्टोबर, १९८३.

**वसंतराव पाटील**
मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य

# मनोगत

वाळव्याचे क्रांतिवीर नागनाथ रामचंद्र नायकवडी हे माझे जिवलग स्नेही, बेचाळीस सालच्या स्वातंत्र्य-संग्रामातील फौजी संघटनेचे निर्माते, शिक्षणकार्याने बहुजनांचे अज्ञान दूर करणारे कर्मयोगी, सामाजिक व सहकार क्षेत्रात क्रांती घडवून दाखवणारे सहकार महर्षीमित्र. यांनी कुठल्याही फळाची अपेक्षा न करता जे आजपर्यंत महान कार्य केले आहे; ते भावी पिढीला मार्गदर्शक ठरणार आहे. नागनाथ अण्णांनी केलेलं कार्य आजतागायत अंधारात आहे. ते मी पुस्तकरूपाने प्रकाशित करण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे. देशामधले दारिद्य नाहीसे करण्यासाठी, वयाच्या साठाव्या वर्षीसुद्धा अण्णा अहोरात्र कसे झटत आहेत याची कल्पना सर्वांना येईल. बेचाळीस सालच्या अत्यंत क्रांतिकारक महत्त्वाच्या घटना, शिक्षण व समाजकार्यामधून हु. कि. अहीर सहकारी कारखान्याची उभारणी कशी केली हे एक महान आश्चर्यच म्हणावं लागेल.

**" बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊले "**

मी व नागनाथ अण्णा एके दिवशी म. गा. विद्यालय, आष्ट्याच्या ग्राऊंडच्या स्टेजवर चांदण्या रात्री गप्पा मारीत बसलो होतो. मी अण्णांना सहज म्हणालो. " गोरगरिबांचे ज्यात कल्याण होईल आणि ज्यामध्ये

त्यांची दाद लागेल असा वाळव्यास एक सहकारी साखर कारखाना काढाल का?" अण्णांनी पटकन सांगितलं, "मी थोड्याच काळात तुमची मनीषा पूर्ण करून दाखवतो."

अवघ्या दोन-तीन वर्षांत वाळवा गावचे प्रथम इरिगेशन करून घेतले. पूर्वप्राथमिक तयारी करून घेतल्यावर कारखान्याच्या प्रयत्नास लागले. दोन चार महिन्यात कारखान्याची परवानगी मिळवून दाखवली. अण्णा जे बोलतात ते करून दाखवतात. त्यांच्या कुठल्याही कार्यात कितीही अडचणी आल्या तरी ते इच्छित कार्य केल्याशिवाय रहात नाहीत. "मोडेल पण वाकणार नाही, तुटेल पण झुकणार नाही." हा त्यांचा बाणा आहे. त्यांची जिद्द, चिकाटी व प्रयत्न वाखाणण्याजोगे आहेत. त्यांच्या प्रयत्नाला यश आल्याशिवाय रहात नाही. कुठलेही कार्य ते निःस्वार्थ, त्याग व कसोटीनं, संघटित रीत्या करीत असतात. "प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलही गळे" म्हणतात ते काही खोटे नाही. असं हिमालयासारखं काम करणाऱ्या माझ्या परममित्राला हिमालयाची उपमा शोभून दिसते. ४२ सालच्या आंदोलनात मणदूरच्या जंगलात फौजी संघटनेच्या क्रांतिवीरानी पोलिसांच्या बरोबर घोर संग्राम केला. यात किसन अहीर व नानकसिंग हुतात्मा झाले. नागनाथ अण्णांनी ही संघटना किती प्रयासानं चालविली होती हे दिसून येईल. नागनाथ अण्णा आपलं तन, मन, धन कुठल्याही कार्यात अहोरात्र चंदनाप्रमाणे झिजवत असतात. त्याना अशी विधायक कार्ये व देशसेवा करण्यास परमेश्वर दीर्घायुष्य देवो हीच सदिच्छा आहे.

स्व. राष्ट्रकवी मैथिली शरण गुप्त यानी 'पंचवटी' हिंदी खंडकाव्यामध्ये एक महान तत्त्व प्रतिपादन केले आहे. हे तत्त्व नागनाथ अण्णांना तंतोतंत लागू पडते.

एक अपूर्व चरित लेकर, जो उसको पूर्ण बनाते है।
वेही आत्मनिष्ठजन जगमे, परम प्रतिष्ठा पाते है।

असलं अलौकिक कार्य दृढ निश्चयाने करणाऱ्या क्रांतिकारक व्यक्ती जगात दुर्मिळ आहेत. त्यांची जगात फार मोठी योग्यता आहे. म्हणूनच माझ्या

या सहकारी जिवलग मित्राचे कार्य व चरित्र तरुण वाचकांच्या समोर आणण्याचा अत्यानंद मला होत आहे. मला अभिमान वाटतो की यामधून तरुणांच्यामध्ये राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण झाल्याशिवाय रहाणार नाही.

या 'जीवन संग्राम' पुस्तकाची प्रस्तावना आमचे बेचाळीस सालचे सहकारी व परमस्नेही, पद्मभूषण सहकार महर्षी महाराष्ट्राचे आवडते व लाडके मुख्यमंत्री माननीय ना. वसंतराव दादा पाटील यानी उत्तम व सत्वर लिहून उपकृत केलं याबद्दल मी त्यांचं हार्दिक स्वागत करतो. त्याचप्रमाणे त्यांच्या मार्गदर्शनाने हे पुस्तक छापण्याची जिम्मेदारी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने स्वीकारली व प्रथम आवृत्ती प्रकाशित करून स्वातंत्र्यवीर, क्रांतिवीरांचा यथोचित सन्मान केला याबद्दल मी महाराष्ट्र शासन आणि मंडळांचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे, सचिव, श्री. सु. द्वा. देशमुख व मानसेवी संपादक डॉ. वा. ना. कुबेर, वाङ्मय प्रकल्प विभाग, पुणे यांना मी धन्यवाद देतो.

तसेच "हिमालयाच्या शिखरावर मावळलेले दोन ध्रुव तारे" या पुस्तकाचे साहाय्य मला लाभले त्यामुळे या पुस्तकाचे लेखक माझे मित्र श्री. विप्लवी चामुंडराय (दुधगांव) यांचा मी आभारी आहे.

हु. कि. अहीर कारखान्याची सध्या सत्वर उभारणी करणारे बुकाबू उर्फ कंपनीचे प्रमुख इंजिनिअर 'हरभट चाचा' व त्यांचे अन्य सहकारी ज्यांनी पस्तीस साखर कारखाने उभे करण्याचे यशस्वी कार्य केले त्यांना धन्यवाद! व शेवटी वाचकांचे आभार मानून माझे मनोगत संपवितो.

**सा. बा सनदे**

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळातर्फे "जीवन संग्राम" हे पुस्तक प्रकाशित होत आहे ही खरोखरीच आनंदाची गोष्ट आहे. स्वातंत्र्य सैनिक श्री. नागनाथ रामचंद्र नायकवडी यांचे श्री. सा. बा. सनदे ह्या त्यांच्या मित्राने लिहिलेले हे चरित्र. परंतु हे पुस्तक म्हणजे केवळ चरित्र एवढ्यापुरते नाही. स्वातंत्र्य मिळविण्यासाठी या देशातील जनतेने आपापल्यापरीने जे प्रयत्न केले त्यापैकी अशाच एका प्रयत्नाचा हा आलेख आहे. श्री. नायकवडी यांनी स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्याच्या काळात केलेल्या कार्याचीही माहिती या पुस्तकात आली आहे. श्री. सनदे यांनी ही माहितीही अत्यंत सोप्या भाषेत दिली आहे. त्याबद्दल त्यांचे आभार. श्री. वसंतदादा पाटील मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी या पुस्तकास सुंदर प्रस्तावना लिहून दिली. श्री. वसंतदादा सातारा "पत्री" सरकारच्या चळवळीतील एक सेनानी. त्यामुळे त्यांची प्रस्तावना म्हणजे दुधात साखरच. स्वातंत्र्यासाठी धडपडणाऱ्या या स्वातंत्र्यसैनिकाचे चरित्र मंडळातर्फे प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

समर्थ मुद्रणालयाने हे अत्यंत अल्पावधीत काढून दिल्याबद्दल मुद्रणालयाचे चालक व कामगार यांचे आभार.

४२, यशोधन,
मुंबई–४०० ०२०,
दिनांक १४ डिसेंबर, ८३

**सुरेंद्र बारलिंगे,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

# जीवन संग्राम

१० सप्टेंबर १९४४ चा तो दिवस. ते प्रसंग आठवले की अंगावर शहारे उभे रहातात!! हिंदुस्थान स्वतंत्र करण्यासाठी सन १८५७ साली बंड झाले, त्यामध्ये अनेकांचे प्राण गेले, अनेक हुतात्मा झाले. इंग्रजांच्या अन्यायी शासनाचा हिंदी लोकांना वीट आला होता. चीड आली होती. म. गांधींच्या नेतृत्वाखाली हिंदी जनता प्राणपणानं अहिंसात्मक मार्गानं लढत होती. काहींनी सुभाषबाबूंचा मार्ग स्वीकारला होता.

८ ऑगस्ट १९४२ ला मुंबईच्या गवालीया टँकवर म. गांधीनी "चलेजाव, 'भारत छोडो', 'क्विट इंडिया', 'क्विट एशियाचा" ठराव केला. सर्व भारतीय हिंदी जनता खवळून उठली. काहींनी अहिंसात्मक मार्ग तर कांही जवानांनी 'ठोशास ठोसा' देण्याचा मार्ग अवलंबला. सुभाषचंद्र बोसनी तर आझाद हिंद सेनेची स्थापना करून इंग्रजांवर चाल केली. जवानांनी इंग्रजी सत्ता खिळखिळी करण्याचा चंग बांधला व संग्राम करण्यास सज्ज झाले.

असाच एक उमदा, उत्साही, नवजवान होतकरू स्वातंत्र्यानं वेडा झालेला, तरणा बांड विद्यार्थी शिक्षण सोडून या ४२ च्या स्वातंत्र्य संग्रामात आपले जिवलग साथीदार जमवून प्राणपणानं लढला. त्या जवानाचं नाव आहे वाळव्याचे नागनाथ रामचंद्र नायकवडी. यांनी सुभाष बाबूंच्या

तत्त्वाप्रमाणे "ठोशास ठोसा द्यायचा" असा चंग बांधला. यासाठी चार-पाचशे जवानांची फौज तयार केली. 'थावड्या'च्या जंगलात सैनिकी शिक्षण देण्यास सुरुवात केली. मिलीटरी शिक्षण देण्यास, बंदुका, बॉंब, पिस्तुलं यांचा प्रश्न डोळ्यासमोर उभा राहिला. प्रत्येक गावामध्ये काही श्रीमंत, सावकार, इनामदार यांच्याकडे बंदुका होत्या, त्या महत् प्रयासाने त्यांनी जमविल्या. एवढ्या शस्त्रांनी काम भागणं अशक्य होतं म्हणून काही पोलिस स्टेशनवर छापे घालून त्या बंदुका लंपास केल्या. याही बंदुका अपुऱ्या पडू लागल्या. बंदुका, पिस्तुले खरेदी करण्यास पैसा कुठून आणायचा? ही फुकटची शस्त्रं मिळाली परंतु आणखीन शस्त्रं आणायचा प्रश्न अवघड होता. काही दिवस या अपुऱ्या शस्त्रांवरच काम चालू केलं होतं. मिलीटरीचं शिक्षण देण्याकरिता नागनाथांनी दिल्लीला प्रयाण केले. तिथून मोठ्या महत् प्रयासाने मन्नासिंग व नानकसिंग असे दोन अधिकारी आणून थावड्याच्या जंगलात या स्वातंत्र्य सैनिकांना मोठ्या वेगाने शिक्षण देण्यास सुरुवात केली. बऱ्याच बंदुका अपुऱ्या पडू लागल्या या आणावयाच्या कुठून व याला खरेदी करण्यास पैसा कुठून आणायचा? अगदी सोपा व सरळ मार्ग त्यांना मिळाला. सरकारी खजिना लुटणे, पगाराची ट्रेन लुटणे, धुळ्याचा खजिना लुटणे या मार्गाने पैसा निर्माण केला. या पैशांचा विनियोग चांगलाच झाला.

आता नागनाथांनी गोव्याला प्रयाण केले. तिथून बंदुका खरेदी करणे अवघड होते. ती खरेदी केलेली शस्त्रं पाठवून देणं त्याहूनही अधिक कठीण काम होते. यासाठी नागनाथांनी मोठ्या युक्तीनं म्हणजे तंबोऱ्या मध्ये ह्या बंदुका लपवून हळू-हळू ही शस्त्रं पुरी केली. या सैनिकांचा रोजचा खर्चही या पैश्यामधून केला गेला. अशा प्रकारे शस्त्रास्त्रखरेदी व स्वातंत्र्य सैनिकांचे कार्य व खर्च चालत होता.

नागनाथांच्या या हालचालीवर इंग्रज सरकारची बारीक नजर होतीच. परंतु इंग्रजांचं पोलिस खातं याना पकडण्यास फारसं धजत नव्हतं. यांना पकडायचं म्हणजे मृत्युशी खेळ खेळण्यासारखं होतं! या स्वा. सैनिकांचे सैनिकी शिक्षण जंगलात टेकडीच्या आडाला मैदानात बिनधोकपणे चालू

होतं. याचा सुगावा इंग्रज सरकारला लागणं फार अवघड होतं. परंतु त्याकाळी इंग्रज सरकारचं गुप्त खातं फारच बलवान आणि तरबेज होतं.

या लढ्यामध्ये क्रांतिसिंह कै. नाना पाटील व क्रांतिवीर नागनाथ अण्णा हे प्रतिसरकार स्थापन करण्याच्या दृष्टिने वरचेवर राजाभुजाचे सपाट इथे (मल्लिकार्जुनच्या डोंगराजवळ) मीटिंगा घेत होते त्यावेळी सर्व सहकारी जमा होत असत. क्रांतिवीर नागनाथ अण्णा भूमिगत असतानाही गावो-गावी त्या काळी जनहिताचे कार्य करीत होतेच. आष्टा गावाच्या पश्चिमेस व वाळवे गावाच्या दक्षिणेस अंदाजे १० कि. मी. अंतरावर गोटखिंडी नावाचं एक लहानसं खेडं गाव आहे. डोंगराच्या पश्चिमेकडून वारणा नदी वाहते आहे. मल्लिकार्जुन डोंगराच्या मध्यावर महादेवाची पिंडी व तलाव असलेले मंदिर आहे. डोंगरावर झाडा–झुडपांची किर्र दाट झाडी, करवंदे-बोरांच्या दाट जाळ्या व वेलींनी डोंगर फुलून गेलेला असायचा. जंगली हिंस्र प्राण्यांना लपून बसायला गुहा, जाळ्या, वेली या भरपूर होत्या. सपाट पायथ्यावर पिण्यासारखे भरपूर स्वच्छ, चवदार पाणी होते. याच ठिकाणी मुसलमान समाजाचे चानिस बाबा चांदबोफारी व बुराफन या दोन सत्पुरुषांच्या समाध्या आहेत. हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचा संगम साधलेला हा डोंगर व गाव आहे. या गावामधील लोकांचे ऐक्य नागनाथ अण्णांनी घडवून आणलेलं होतं. गावामध्ये कितीही ऐक्य असलं तरी काही देशद्रोहीही असायचेच. काही या गावचे स्वा. सैनिक नागनाथ अण्णांचे साथीदार होते. त्यापैकी एक रामू गोटखिंडे त्यांचा मित्र होता. तो यावेळी त्यांच्या बरोबर होताच. यानेच पुढे नागनाथ अण्णाना दगा दिला होता. त्याची हकिगत पुढे आली आहे. या गावांमध्ये नागनाथ अण्णा विधायक काम करायला आले असताना (भूमिगत अवस्थेत) गण-पतराव पाटील गुरुजींच्या घरी थांबले होते. ही बातमी कुणा एका दुष्टाने पोलिस ठाण्यावर जाऊन दिली. डोंगराळ भाग असल्याने इंग्रजानी नाग नाथ अण्णांना पकडण्यासाठी बंदुकधाऱ्या घोडेस्वारांची पार्टी पाठवली होती. सायंकाळी सहा-सात च्या सुमारास गावाच्या सभोवताली अचानक बंदुकधारी घोडेस्वारांचा कडेकोट पहारा चालू झाल्याची बातमी गावामध्ये

हा—हा म्हणता पसरली. या वेढ्यामधून बाहेर पडणं अवघड होतं. गावामध्ये भीतीचं वातावरण पसरलं होतं, घबराट निर्माण झाली होती. या नागनाथ अण्णांच्यामुळे गावावर मोठं संकट आलं आहे. अशा फराऱ्याला थारा देणं योग्य नाही. फराऱ्याचं लई ढोंग चाललंय. यांचा चांगला काटा निघाला पाहिजे. कसलं देशकार्य करत्यात? असे रामू व गावामधले इंग्रज धार्जिणे लोक चर्चा करीत होते.

नागनाथ अण्णांना ही बातमी ताबडतोब कळली. त्यांनी बातमीदाराचं कपट कारस्थान ओळखलं. पुढं त्याला शोधून शिक्षा केली ही गोष्ट वेगळी. परंतु प्रसंग मोठा बाका आला होता. यामधून सही-सलामत सुटका करून घेण्याचं ठरवलं. ते मोठे धूर्त, चलाख, धोरणी, कावेबाज व समयसूचक वीर आहेत. ते गुरुजींच्या घरी रात्री झोपले. झोपण्यापूर्वी त्यांच्याकडून साधंमादं, फाटकं तुटकं, जाडं भरडं धोतर, फेटा व दंडक ही वस्त्रे आणि विळा दोरी या वस्तू जमवल्या. पहाटे उठून त्यांनी शेतकरी सर्जाचा पोषाख केला. गुरुजींनाही हा पोषाख करणं भाग पडलं. कपाळाला गंध लावलं. खांद्यावर खोरं, हातात विळा व दोरी, पायात पायताण अशा पोषाखात गुरुजींना बरोबर घेऊन डोंगराच्या दिशेने बेदरकारपणे निघाले. घोडेस्वार पोलिसाना वाटलं की, सकाळी दिवस उगवल्यावर गावामध्ये घुसून घर-घर तपासून नागनाथ अण्णांना पकडायचं. परंतु आश्चर्य काय? क्रांतिवीर नागनाथ अण्णा गावामध्ये बाहेर अशा पोषाखात आले. पहातात तो बंदुकधारी घोडेस्वार पोलिसांचा पहारा चालू आहे. तोंडाला तोंड दिसत नव्हतं. नागनाथ अण्णा व गणपत गुरुजी न भिता, न घाबरता गावाबाहेर जाण्यास निघाले. एक पोलिस म्हणाला "अरं ए कोण, आहेत ते? कुठं चाललाय?" नागनाथ आपल्या शेतकरी व खेडवळ भाषेत म्हणाले, "आम्ही कुणबी हाय. बाबा बैलांना गवत कापून आनायाला चालल्या. रातभर गुरं ढोरं उपास पोटी हैती. आमाला लवकर परतायला हवं, जातो आमी." असे म्हणत म्हणतच दोघे पुढे निघून गेले. पोलिसांच्या हातावर तुरी दिल्या. सर्व चोरवाटा त्यांना माहीत होत्या. डोंगराच्या पायथ्या पायथ्याने त्यांनी अर्ध्या तासाच्या आत नदी पार

करून ऐतवडे गावी पोहोचले. सूर्योदय झाल्यावर इकडे घोडेस्वारांनी सारं गाव धुंडाळलं. परंतु त्यांना क्रांतिवीर नागनाथ अण्णा कसे सापडायचे ? त्यानंतर ऐतवड्याहून परत आल्यानंतर गुरुजींना मात्र अटक करण्यात आली.

नागनाथ हे नागासारखे कुठं आणि कुठल्या गुहेत व कधी लपून बसायचे हे फक्त त्या परमेश्वरालाच माहित ! कर्मवीर भाऊराव पाटील यांचं एतवडे गाव त्यावेळी स्वातंत्र्यासाठी व देशप्रेमानं भारावून गेलं होतं. या गावामधून बरीच मदत स्वा. सैनिकांना मिळत असे. या गावात वेळोवेळी गुप्त मीटिंगा घेतल्या जात होत्या. गावगुंड व सरकारी अधिकाऱ्यांच्या अन्यायापासून या गावचे संरक्षण हे स्वा. सैनिक करीत होते. त्यामुळे सर्व गावाचं सहकार्य या स्वा. सैनिकांना (नागनाथांना) चांगल्या प्रकारे मिळत होते. या गावच्या स्त्रियांनाही त्या काळी स्वातंत्र्याचे वेड लागले होते. ऐतवडे गावच्या राजमती पाटील (ताई) नावाच्या स्वा. सैनिका स्वातंत्र्यासाठी इंग्रजाविरुद्ध लढत होत्या. त्यांनी शस्त्र चालविण्याचं शिक्षण घेतलं होतं. या स्वा. सैनिकांच्या तुकडीचं नेतृत्व करू लागल्या. सैनिकांच्या जेवण खाण्याची व्यवस्था बघू लागल्या. देशासाठी प्राण तळ-हातावर घेऊन वण-वण फिरू लागल्या. घरी त्यांना ना आई-वडील ना भाऊ-बहीण. भला मोठा वाडा, जमीन-जुमला, पैसा-अडका याचा उपयोग स्वा. सैनिकांसाठी, देशासाठी करीत होत्या. लक्ष्मीबाई प्रमाणे. पराक्रमी व त्यागी नागनाथांच्या कॅम्पना व कार्याला आता फार मोठी गती आली होती. इंग्रजांना क्रांतिवीर नागनाथ अण्णा यांच्या कृतीची मोठी दहशत निर्माण झाली होती. म्हणूनच की काय इंग्रज सरकारनं त्यावेळी इंग्लंडचा सेनाप्रमुख तज्ञ गिल्बर्ट साहेबाची सातारा जिल्हयावर खास नेमणूक केली होती. साहेब सहा फूट उंच, गोरा, सशक्त, धिप्पाड, चलाख व मुत्सद्दी होता. त्यानं नागनाथाला पकडण्याचा विडा उचलला होता म्हणे ! परंतु लक्ष्मीबाईनं हनुमंताच्या नवसानं देशकार्यासाठी मागून घेतलेला, स्वातंत्र्याचं लहाणपणापासून पाजलेलं बाळकडू व्यर्थ जाईल कसं ? तो सहजा–सहजी सायबाला सापडणार कसा ? सत्यासाठी

लढणारा हा रामचंद्राचा सुपुत्र. स्व. नवांगुळ गुरुजींनी सातवीमध्येच स्वातंत्र्याचे दिलेले धडे आमच्या मनावर चांगले बिंबलेले होते. त्याच वेळी लेखक मित्रानं शिकवलेले कुस्तीचे डाव, बेचाळीसच्या लढ्यात सायबाला कशी ढाक द्यायची व चितपट करायचं याचा खरोखर उपयोग झाला होता यांत शंका नाही.

नागनाथ हे माझे मित्र साडेपाच फूट उंच, रंग गोरा, तरणाबांड गुटगुटीत बांधा, कमावलेलं पोलादासारखं शरीर, धोरणी, मुत्सद्दी, चलाख, चपळ, हसतमुख आणि धाडसी स्वभावाचे होते. स्वातंत्र्यासाठी प्राणाची पर्वा न करणारे नागनाथ सायबाच्या स्वभावाला पूर्णपणे ओळखून होते.

सायबानं आल्या आल्या फोडा-झोडा नीतीला सुरुवात केली. अट्टल गुंडाना हाताशी धरलं, जनतेला या गुंडा करवी त्रास द्यायला सुरुवात केली, त्याच बरोबर गुंडाना अनेक आमिषे दाखवून नागनाथ व त्यांच्या टोळीचा नायनाट करायला प्रोत्साहन दिले. परंतु याचा परिणाम उलटा झाला. नागनाथ व त्यांच्या साथीदारांनी सायबाची ही हालचाल ओळखली व प्रथम या टोळीने या गुंडाचा संपूर्ण नायनाट केला व सतत इंग्रजांच्या बरोबरही संग्राम करीत होते. (या लढ्यात वाळव्याचे त्यांचे स्वा. सैनिक जवान पैलवान कै. किसन अहीर, पडवळवाडीचे कै. बाबूराव कोकाटे, कै. प्रताप पाटील हे स्वा. सैनिक पोलिसांच्या बरोबर सतत संग्राम करीत होते. नागनाथ अण्णांनी सहकाऱ्याच्या नावाने वाळव्यास ह. कि. अहीर विद्यालय काढून मित्राची कीर्ती पसरवली आणि याच नावाने सहकारी साखर कारखाना काढून त्यांचे नाव अजरामर करून त्यांच्या ऋणाचे उतराई झाले. साखर कारखान्याची मूळ कल्पना लेखक मित्राने नागनाथांना देताक्षणीच तो त्यांनी अल्पावधीत प्रत्यक्ष वाळवे गावी उभारला. यावरून त्यांच्या महानकार्याची महान शक्ती दिसून येते.)

नागनाथ हे फार धोरणी मुत्सद्दी व दूरदृष्टीचे वीर आहेत. सैनिक व स्वतः सुरक्षित राहून गुंड व सरकारला त्राही भगवान करून सोडण्याच्या अनेक युक्त्या त्यांना सुचत होत्या. समय-सूचकता, अचूक निर्णय, हजर-

जवानीपणा हा त्यांच्या अंगी फार मोठा गुण आहे. ऐतवडे गावी वेळो-वेळी मीटिंग, मेळावे, महत्त्वाच्या निर्णयाचे कार्यक्रम होत असत. रात्री कधी एखाद्या गावामध्ये मुक्काम केला तर एका रात्रीत तीन ठिकाणी झोपण्याच्या जागा बदलत असत, नाही पेक्षा नेहमी गावालगत आस-पासच्या वस्तीवर, मळ्यात किंवा नदीकाठी मळीला एखाद्या छपरात झोपायचे. अशी ही त्यांची नेहमीची झोपण्याची पद्धत असे. गोरखिंडी गावच्या प्रसंगाने ते सावध झाले होते. त्यामुळे ते शत्रूला सहजा–सहजी कुठं सापडणे अशक्य होते.

ऐतवडे गावच्या गावाबाहेरील एका मळ्यात शेतकऱ्याच्या विहीरीवर मोटवणावर एक भले मोठे वडाचे झाड होते आणि त्याच्या पारंब्याचे बारीक जाळे त्या विहीरीच्या पाण्यापर्यंत जाऊन पोहचले होते. आसपास विहीरीवर झाडं वेली यांची गर्द झाडी होती. अशा या मोट-वणावर मुळ्यांच्या बारीक जाळ्यात एक गुहा खोदून ठेवली होती. ती गुहा कुणालाही दिसत नव्हती. त्या शेतकऱ्याला सुद्धा या गुहेची कल्पना कधी आली नव्हती. सायबानं पकडण्यासाठी केलेला पण त्यांन हाणून पाडायचा होता, म्हणून त्यानी ही गुहा दूर दृष्टीकोनातून मोट-वणावर विहीरीत खोदून ठेवली होती.

ऐतवडे गावी जिल्ह्यामधील सर्व कार्यकर्त्यांचा एक मेळावा त्यांनी घेतला होता. सर्वांना मार्गदर्शन करणारे गुरुवर्य रा. भारती हजर होते. कार्यक्रम चालू होता, परंतु इकडे कुणी एका श्वान वृत्तीच्या देशद्रोहीने मेळ्याची बातमी सायबापर्यंत पोहोचवली होती, मीटिंग संपली होती, ताईच्या घरी जेवणाचा कार्यक्रम आयोजित केला होता. जेवणाची तयारी चालली होती. पानं मांडली होती, एक-दोन वाजण्याचा सुमार, सर्वांना कडकडून भूक लागली होती. पानावर जेवणासाठी सर्वजण बसले होते. दारासमोर सोप्यात नागनाथ आण्णा जेवणाकरता बसले होते, समोरून येणारा जाणारा माणूस सहज दिसत असे. जेवणाचा पहिला घास घेणार तोच, बुटांच्या पावलांचा आवाज कानी पडला ! नागनाथानी काहीतरी धोका आहे हे ओळखून घास खाली ठेवला तो दत्त म्हणून दारासमोर

पायरीवर गिल्बर्ट साहेब उभा असल्याचे पाहिले, त्याचे एक पाऊल पडताक्षणीच नागनाथ अण्णा चटकन उठून परसदाराला गेले आणि मागील दाराच्या तटावरून वाघासारखी उडी घेऊन पळत सुटले. सायबानं ओळखलं की परसदाराच्या तटावरून उडी मारून जाणारा हा नागनाथच असला पाहिजे, आणि तोच याला हवा होता. सायबानं तटावरून उडी मारून पलिकडे जाऊन त्यांना पकडण्याचा निश्चय केला. सायबानं तटा-वरून चढत उडी मारायचा प्रयत्न दोन-तीन वेळा केला, शेवटी महत् प्रयासाने कशीबशी एकदाची उडी मारून साहेब तटापलीकडे गेले. एवढ्या अवधीत नागनाथांनी बरीच लांब मजल मारली होती. पाठी-मागे वळून पहावयास सुद्धा त्यांना उसंत नव्हती. थेट त्यांनी त्या शेतकऱ्याच्या विहीरीकडे धाव घेतली. पाठीमागे साहेब मात्र किती अंतरावर आहे हे त्यांनी वळून सुद्धा पाहिले नाही. साहेब मात्र हातात सातबारी भरलेले पिस्तुल घेऊन धापा टाकीत पळत होता. नागनाथांच्या हातात पिस्तुल नसल्याने सायबाशी प्रतिकार करणे अशक्य होते. साहेबाच्या गोळीला व्यर्थ बळी पडणे किंवा तुरुंगात खितपत पडणे त्याना पसंत नव्हते. म्हणून त्याना कुठंतरी लपल्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. समोर काही अंतरावर पळत असलेली व्यक्ती अचानक दिसेनाशी झाली. नागनाथ झाडाच्या पारंबी वरून सरसर त्या मोटवणाखाली खोदून ठेवलेल्या गुहेत चटकन लपून बसले होते. मातृभूमिनं भारतमातेनं त्यांना आपल्या कुशीत सुरक्षितपणे लपवलं होत. हे सायबाला कसं कळणार ? अचानक व्यक्ती अदृश्य ! साहेब थक्क झाला. त्याला वाटले या विहीरीत खाली बुडाला असावा. साहेब मोटवणावरून विहीरीत वाकून बघू लागला. पाणी संथ होते. बराच वेळ वर उभा राहिला. आता वर येईल, मग वर येईल असे त्याला वाटत होते. पण व्यर्थ. आजू-बाजूच्या गर्द झाडीझुडपात शोधू लागला. शेजारी असलेल्या छप्परात पाहिले, शेवटी विहीरीत खाली उतरून पाण्याच्या कडेला जाऊन साहेब उभा राहिला. विहीरीतच बुडाला असावा असा त्याचा कयास होता. पाण्याच्या पृष्ठभागावर येताच त्याला गोळी घालायची असा मनाशी त्यानं निश्चय केला होता. पिस्तुल

रोखूनच उभा होता. गुहेच्या तोंडावर बारीक मोठ्या पारंब्यांचे चिक्कार जाळे पाण्यापर्यंत लांब गेले असल्याने गुहा दिसणे अशक्य होते. सायबाचे सर्व हावभाव त्या गुहेमधून नागनाथ आपण मात्र पहात होते. झाडावर पक्षांचा किलकिलाट, बेडकांचा आवाज सायबाच्या कानी पडत होता. बराच वेळ उभा राहून त्याची पूर्ण खात्री झाली कीं, मनुष्य एवढा वेळ पाण्यात बुडून राहू शकत नाही म्हणून तो विहीरीवर आला. मोटवणावर पिंपळाच्या झाडावर दात ओठ खाऊन बुटाचे पाय तिथं आपटत होता, त्याची जाणीव नामनाथाना गुहेत होत होती. शेवटी साहेबाला काही अंतरावर एक शेतकरी कुळव हाणत होता तो दिसला. साहेब त्या शेतकऱ्याजवळ गेला व त्याला हिंदी भाषेत म्हणाला "यहाँसे कोई गया है ?" त्या शेतकऱ्याने "गया है" येवढेच शब्द उच्चारले. त्याला हिंदी काय कळणार ! 'गया है' म्हटल्याबरोबर साहेब बोट दाखवलेल्या दिशेने बराच लांब गेला. परंतु काही थांगपत्ता लागला नाही. निराशेने तो गावात परत येऊ लागला. शेवटी सायबाला असा भ्रम पडला की, "याला, नागनाथ अण्णांना देव प्रसन्न असला पाहिजे ! हा 'नाग देव' असला पाहिजे ! याला जमीन सुद्धा भांग देते. पहाता पहाता अदृश्य झाला ! हा आता आपणास कधीच सापडणार नाही आणि यापुढे याच्या नादी लागता उपयोगी नाही. आपलाच एखाद्या वेळी घात होईल." अशी सायबाच्या मनाची धारणा झाली व तो आणलेले सशस्त्र पोलिस घेऊन निघून गेला. त्यांला नागनाथालाच पकडायचा होता. इतर साथीदारही केव्हांचे पसार झाले होते. त्यानं नागनाथांना पकडायचा नाद सोडून दिला. इथंच इंग्रजांचा पराभव झाला होता असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. नागनाथ अण्णांच्या जीवनामध्ये बेचाळीस सालच्या लढ्यात रोमांचकारी राष्ट्रीयत्वाचे व क्रांतिकारी असे अनेक प्रसंग येऊन गेले. त्यापैकी महत्त्वाच्या अविस्मरणीय प्रसंगाचा उल्लेख केला आहे. यापैकी असाच एक प्रसंग जो त्यांच्या क्रांतिकारी कार्याचा कळस व त्यांना अत्युच्च शिखरावर पोहचवणारा आणि सध्याच्या

तरुण पिढीत देशाभिमान निर्माण करणारे असे महान प्रसंग या ठिकाणी दिलेले आहेत.

"घरका भेदी लंका ढावे," अशी एक हिंदीत म्हण आहे. रावणाची लंका घरभेदीपणामुळे लयाला गेली हे सर्वश्रुत आहे. अशी इतिहासात अनेक उदाहरणे दिसून येतील. आपल्या शेजारचा मनुष्य किंवा घरातील एखादा शत्रूला वश झाला की त्याचा हमखास पराभव, धोका झाल्याचे आपण रोजच्या जीवनात पहातो. लोभी व मानधनाला हपापलेला मनुष्य असली कृत्ये करायला कधीच मागे पुढे पहात नाही. मग तो भाऊ असो, मित्र असो किंवा राजा असो; त्याची तो परवा करीत नाही.

गिल्बर्ट साहेबालाही नागनाथ अण्णा सापडले नाहीत, त्याना पकडण्यासाठी सरकारने पाच हजारांचे बक्षीस लावले होते. शिवाय इंग्रज सरकारचे सन्मानपत्र, सरकार दरबारी मान मर्तबा, संरक्षण इत्यादि गोष्टींचा लोभ हाव नागनाथ अण्णांच्या एका राक्षसी मित्राच्या मनात निर्माण झाली. नागनाथ अण्णांच्या विषयी त्याच्या मनात पाप वासना निर्माण झाली. या पापाचा सुगावा कुणाला व कसा कळणार ? जगात सर्व शोध शास्त्रज्ञ लावतात, परंतु माणसाच्या मनाचा शोध व पत्ता अद्याप कुणालाही लागला नाही व लागणार नाही. काळाच्या पोटात काय आहे हे कोणाला कळले आहे का ? हा काळ म्हणजेच अण्णांचा 'रामू' नावाचा मित्र होय. हा नेहमी त्यांच्या कॅम्पमध्ये त्याच्या बरोबर असायचा. मग याच्या बद्दल शंका कशी बाळगायची ?

नागनाथ अण्णा सहा–सहा महिने घरी येत नव्हते. त्यांच्या मातोश्री लक्ष्मीबाई त्यांना घराकडून गुपचूप जेवण पोहचते करायच्या. जेवण देणाऱ्या व्यक्तिकडून दोन्हीकडील बातम्या आईना व मुलाला इत्थंभूत समजायच्या, आईना आपला मुलगा कुठं आहे याचा पत्ता असायचा, परंतु इंग्रज सरकारनं त्यांच्या गळ्यावर सुरी ठेवली तरी सुद्धा त्या आपल्या मुलाचा पत्ता कधी कुणाला सांगायच्या नाहीत. आणि अद्याप त्या सांगत नाहीत, परंतु सर्व गाव सुद्धा त्यांचा पत्ता सांगत नाही. म्हणून इंग्रज सरकारनं त्यांचा खूप छळ केला. आठ-पंधरा दिवसातून

वरचेवर त्यांच्या घरावर सशस्त्र पोलिसांचा छापा असायचाच. जमीन-जुमला घरदार इंग्रज सरकार जप्त करायला भीत होतं. गावच्या लोकांचं सहकार्य असल्यानं त्यांना काही कमी पडू दिले नाही. त्या गावचे व आसपासच्या गावचे अनेक वीर अण्णांच्या कॅम्पमध्ये सैनिकी शिक्षण घेत होते. लक्ष्मीबाईचे वडील कै. संभाजीराव हे त्या काळी जमादार असल्याने त्यांना धिटाईचे बाळकडू मिळालेले होते. त्यामुळे त्यानी इंग्रज सरकारच्या या त्रासाला मोठ्या धैर्याने सतत तोंड दिले. प्रत्येक छाप्याचे वेळी "तुझा मुलगा कुठं आहे सांग" असे म्हणून त्रास देत. आईचे उत्तर ठरलेलं असायचं "मला कायरे ठावं" डी. एस. पी , फौजदार, पोलिस बंदुकी घेवून त्यांच्या सामोरी येत त्यावेळी आई म्हणत "आरं आसल्या फुकण्या मी लई बघितल्यात मला या फुकण्याची भीती नगं; मी त्याला भिणार नाय नागनाथ देशासाठी स्वराज्यासाठी वण-वण फिरतुया तुम्ही इंग्रज सरकारचं तुकडं खाणार चाकूर हायसा, त्यो कुठं हाय ते मला काय इचारता सारं ! हिंमत असली तर त्याला धरून दावा की" अशा स्पष्ट व खरमरीत उत्तरानं त्यांची तोंड काळी पडायची. बायका माणसाना धमकावयाची व कमी जास्त बोलण्याची हिंम्मत होत नव्हती. लक्ष्मीबाईंची दोन चार वेळा तुरूंगांत-सुद्धा रवानगी केली होती. परंतु त्यालाही त्या डगमगल्या नाहीत. मुलासाठी, देशासाठी त्यांनी प्राणाची परवा केली नाही. एकदा डी. एस. पी. नी अचानक छापा घातला. त्याला घरात नागनाथ दडून बसला असल्याची दाट शंका आली व "दार उघडा" म्हणून दारावर बुटाची लाथ मारली. आईनं दार लवकर उघडलं नाही. त्याची शंका अधिकच बळावली व त्यानं लाथा मारून दार मोडले व तुझा मुलगा कुठं आहे सांग, लक्ष्मीआई वाघीणीसारखी खवळून आली व म्हणाली "मेल्या गरीबाचं दार मोडलंस, तुला लाज वाटत नाही ? मराठमोळ्या शेत-कऱ्याच्या घरी पुरुष मंडळी नसताना दार मोडायचं कारण काय तुला" असे म्हणून वाघीणीनं त्या सायबाची बंदुक बेधडक धरून दोन-चार हिसडे त्याला दिले व म्हणाली, "संमदं घर हुडिक तुला कुठं मुलगा

सापडला तर धर की त्याला." साहेब दोन हिसक्यात नरम पडला होत व घर शोधू लागला. घर शोधत असता त्याला आई म्हणायची "त्या तिथं त्यो दडून बसलाय बघ! त्यानं तुला गोळी घातली तर फुकट मरशील. धडभल्यानं आपल्या बायका मुलात जा" साहेब आपल्या जिवाला भीत-भीतच बघायचा! दबकायचा, लक्ष्मीआई खो-खो हसायच्या अशी त्याची फजीती झाल्यावर, साहेब काळं तोंड घेऊन निघून जायचा, परंतु दुसऱ्या दिवशी सायबानं आईची रवानगी सहा महिन्यांच्या मुदतीनं तुरुंगात केली. पुण्याच्या जेलमध्ये अरुणा असफअल्लीसारख्या बऱ्याच स्त्रिया कारागृहात होत्या, चार महिन्यात त्या सर्वांच्या राष्ट्रमाता बनल्या, पोलीसांना हैराण करून सोडलं त्यांनी. त्याना जास्त दिवस जेलमध्ये रहाणं आवडत नव्हतं, कारण मुलाला योग्य मार्गदर्शन करणं त्याच्यावर घारीसारखी नजर ठेवणं, त्याची शिदोरी पोहोचती करणं या गोष्टी त्यांना जेलमध्ये करता येत नव्हत्या. त्यांनी स्वतःची सुटका लवकर व्हावी म्हणून वेड्याचं सोंग घेतलं. सरकारला त्राही भगवान करून सोडलं. सरकारला वाटत होतं बाईला तुरुंगात घातलं की मुलगा वाळव्यास येईल; मग आपणत्याला पकडू परंतु झालं उलटच, आईना सरकारनं सहा महिन्याऐवजी तीन महिन्यातच जेलमधून सोडून दिलं. आईनं मुलासाठी, देशासाठी वेड घेतलं होत हे कुणाला कसं कळणार? आई जेलमधून आल्यानंतर नागनाथ आठ-पंधरा दिवसांनी आईना भेटण्यासाठी वाळव्यास जिवलग मित्रासह रात्री अकरा-बाराच्या सुमारास घरी आले.

आईची विचारपूस करून वेडाचं सोंग कशासाठी ही खात्री झाल्यावर मळीकाठी झोपावयास एक-दोनचे सुमारास निघून गेले. गावामधील बरोबर आणलेले जिवलग साथीदार गावामध्ये आपले आप्तेष्टांना भेटण्यास अण्णांचा निरोप घेवून निघून गेले, त्यामध्ये रामू मित्र ही गावात मित्राना भेटण्यास जातो असे सांगून निघून गेला. इकडे अण्णा मळीकाठच्या छपरामध्ये जावून गाढ झोपी गेले होते. सर्व मित्राना हे स्थान माहित होतं. ते तासाभरात परत येवून छपरात नेहमीप्रमाणं झोपतील

असं वाटलं. परंतु तेही गावातच थांबले. रामूने मात्र सरळ अश्याचे पोलिस ठाण्याकडे धाव घेतली. त्याच्या मनात नागनाथांच्या बद्दल दुष्ट भावना निर्माण झाली होती. त्याला अण्णांचं नेतृत्व सहन झालं नाही त्याना पकडून देऊन बक्षिस, मान, सरकारची वाहवा मिळवायचा स्वार्थ निर्माण झाला होता. त्या आडग्या माणसाला स्वातंत्र्याची किंमत काय कळणार ? गाढवाला गुळाची चव काय ? त्यानं कुठलाही मागचा पुढचा विचार न करता सरळ फौजदार साहेबांना भेटून नागनाथ वाळव्यास मळीकाठी असल्याची बातमी दिली. त्यांना तेच पाहिजे होतं. त्यांनी रामूला सोडलं नाही निश्चित जागा दाखवण्याकरता रामूचा उपयोग होणार होता. फौजदाराची छाती धडधडत होती. त्यापेक्षा जास्त पोलिसांचे काळजात धस्स झालं होतं. अण्णानां पकडणं म्हणजे 'मृत्यूला बोलावणं आहे' असे सर्वांना वाटत होतं, परंतु इलाज नव्हता. इंग्रजांचे भाडोत्री नोकर होते ते. फौजदार सायबानं काळीज घीट करून सशस्त्र पोलिसांची लॉरी भरून, तयारी निशी रामूला बरोबर घेऊन वाळव्याच्या दिशेने निघाला. अर्ध्या तासात लॉरी आली. लॉरीचा आवाज कानी पडू नये म्हणून ती छपरापासून बऱ्याच लांब अंतरावर उभी करून सशस्त्र पोलिस, फौजदार व रामू पुढं असा लवाजमा चोर पावलानी सावकाश छपराकडे निघाला. हा स्वातंत्र्यास्तव वेडा झालेला वाघ झोपी गेला होता. निमकहराम मित्र रामू देशद्रोही राक्षस बनून मित्राला पकडून देण्यासाठी पुढे येत होता. अंधाऱ्या रात्री पोलिसानी दाखविलेल्या छपराला वेढा दिला. रामू छप्पर दाखवून अष्व्याच्या दिशेने गेला. फौजदार भरलेले पिस्तुल रोखीत हळूहळू बॅटरीच्या प्रकाशानं छपराच्या प्रवेशद्वाराजवळ गेला. त्याने नकळत उजेड पाडून पाहीले तो खरोखर नागनाथ गाढ झोपी गेले होते. फौजदाराने त्यांच्या छातीला पिस्तुलाचा स्पर्श करताक्षणीच नैसर्गिकरित्या त्यांचा हात उशाखाली ठेवलेल्या पिस्तुलाकडे वळला. फौजदारही हालचाल ओळखून म्हणाला हांऽऽ "ते पिस्तुल माझ्या हवाली करा. गडबड कराल तर गोळी झाडली जाईल." नागनाथ अण्णानी ओळखलं; ते हडबडून पूर्णपणे जागे झाले. हा काय

प्रकार आहे तो त्यांच्या लक्षात आला! पोलिस बंदुकी रोखून सभोवार जमा झाले होते. कोणत्या निमक हरामाचं हे कृत्य आहे हे मनात ओळखलं, आता गडबड करण्यात अर्थ नाही असे ओळखून फौजदाराला म्हणाले, "अरे मी बेसावध बघून असं अडचणीत खिंडीत पकडतोस काय? हं! हे घे पिस्तुल आणि घाल बेड्या" असे म्हणून त्यांनी स्वतःहून हात पुढे केला. गिल्बर्ट साहेबाला जो वाघ सापडला नाही त्या वाघाला घरच्या भेदीपणामुळं भारतीय पोलिस अधिकाऱ्यांनी बेसावध स्थितीत पकडलं हे दुर्दैव आहे.

नागनाथ अण्णांना लॉरीत बसवलं आणि लॉरी इस्लामपूरच्या दिशेने निघून गेली. त्यांना या तालुका जेलमध्ये तीन-चार दिवस ठेवण्यात आलं व पुढे त्यांची रवानगी महाराष्ट्रातील प्रसिद्ध आणि अतिअवघड अशा कडेकोट बंदोबस्त असलेल्या साताऱ्च्या जेलमध्ये करण्यात आली. त्यावेळी वर्तमान पत्रामधून बातमी प्रसिद्ध करण्यात आली. की "क्रांतिवीर नागनाथ नायकवडी यांना अति महत् प्रयासानं इंग्रज सरकारनं पकडून जेलमध्ये त्यांची रवानगी केली." आता साकारची बरीचशी दहशत कमी झाली होती. सातारा जिल्ह्यातील असंख्य भूमिगत स्वातंत्र्य सैनिक मोठ्या सावधगिरीने वागू लागले.

नागनाथ अण्णांना पकडल्यानंतर त्यांची दोन-चारशे स्वातंत्र्य सैनिक साथिदारांची तुकडी हतबल, निराश न होता ती अधिक जोमाने, उत्साहाने काम करू लागली. आपला नेता जेलमध्ये गेला म्हणून त्यांनी आपल्या देशकार्यात तिळमात्र कमतरता पडूं दिली नाही. ज्या निमक-हराम रामूनं हे दुष्कृत्य केलं त्याच्यावर सर्वजण चिडले होते. पण उपयोग काय? तो सरकारचे पाच हजारचे इनाम मिळवून, फौजदाराच्या घराःलगत खोलीमध्ये मोठ्या ऐषआरामात व इंग्रज सरकारच्या संरक्षणाखाली रहात होता. तो याना लवकर सापडणं शक्य नव्हतं.

साताराच्या जेलमध्ये दोन तीन दिवस गेल्यावर त्यांनी सर्व राजकीय कैद्यांशी हार्दिक मैत्री जोडली. त्यांची सत्वर संघटना केली. अण्णाना राहून राहून वाटू लागले की जेलमध्ये राहून देशकार्य, स्वातंत्र्याची

संघटना, चळवळ, सरकार बरोबर संग्राम करता येत नाही. जेलमध्ये व्यर्थ जीवन घालवणे त्याना पसंत नव्हते. शिवाय आपले साथीदारांचे कार्य थंडावेल, ते नाराज होऊन निष्क्रीय बनतील. कदाचित त्यांच्यात मतभेद निर्माण होऊन फाटाफूट होईल. आपसात एकमेकांना कदाचित पकडून देण्याचा प्रयत्न करतील, अशी शंकाही त्यांच्या मनाला शिवून गेली. जेलमध्ये कुजत पडणं मला पसंत नाही. या इंग्रज सरकारच्या शिक्षेच्या वेळेला सीमा नाही. पाच सहा वर्षांची शिक्षा भोगत जेलमध्ये पडणे म्हणजे "जिवंत असून मेल्यासारखं आहे." देशाच्या अशा स्वातंत्र्याच्या काळाला दिरंगाई, अवधी लागणं योग्य नाही. मरण हे एक ना एक दिवस येणारच आहे. या मरणाला भिऊन भागणार नाही. त्याना एकच ध्यास लागला होता की, स्वातंत्र्य मिळवणं. सरकार निशस्त्र हिंदी बांधवावर गोळ्या घालते आहे, तेव्हा त्यालाही आपण शस्त्रानेंच उत्तर दिल्याशिवाय ते ताळ्यावर येणार नाही असे त्यांना वाटत होते.

जेलमध्ये चार दिवस काढले. एका रात्री अचानक आपल्या जेलमधील स्वातंत्र सैनिक मित्रांना आपले मनातील जेल फोडण्याचा विचार बोलून दाखवला. काही जेष्ठ व श्रेष्ठ स्वा. सैनिक व कामेरीचे एस. बी. पाटील यांना ही अण्णांची योजना सत्वर पटली. सर्वांनी त्याना सहकार्य करण्याचे ठरविले. वेळ, काळ, दिवस सर्व काही योजना आखली गेली. जेल फोडणं म्हणजे मृत्यूशी खेळ खेळण्यासारखे होते. या प्रकारानं जेलमधील राजकीय आणि इतर कैद्यानाही अग्नीकुंडात टाकण्याचा प्रकार होता. इतरांचा छळ होणार याची कल्पना सर्वांना आली होती, परंतु स्वातंत्र्यास्तव ते वाटेल त्या हाल अपेष्टा सोसण्याच्या तयारीत होते.

जेल फोडताना जर यदाकदाचित सापडलोच तर गोळीला बळी पडावं लागणार हे नागनाथ अण्णांनी पूर्णपणे जाणलं होतं. तरीसुद्धा या वाघानं त्याची परवा केली नाही. रात्रीची योजना आखण्यात आली. सातारा जेलची रचना फार विचित्र आहे. आतून त्याचे तट फार उंच आणि बाहेरून चढावाची भर असल्याने कमी उंच. शिवाय सर्व तटावर उभ्या काचा सिमेंट मध्ये बळकट रोवलेल्या होत्या. पिरॅमिड पद्धतीनं हा

जेल फोडण्याची नामी युक्ती अण्गांनी शोधून काढली होती. त्याच–प्रमाणे जेलमधील चार साथी दारांची तयारी करून ठेवली होती. त्यात प्रमुख एस. बी. पाटील वीर होते.

१० सप्टेंबर १९४४ चा तो दिवस, पहाटे चार वाजता सर्व कैद्याना शौच, मुखमार्जन, आंघोळ यासाठी सोडले होते. समोरच्या प्रवेश दाराच्या आत व बाहेर सशस्त्र पोलिसांचा कडेकोट पहारा चालू होताच. पाच सहा वाजे पर्यंत सर्वांचं आटोपून नेमून दिलेल्या खोलीत हजेरी संपल्यावर प्रत्येक कैदी जात असे आणि त्या त्या खोलीची सगळ्यांची दारे लावून कुलपे घातली जात असायची.

ठरल्या प्रमाणे नागनाथ अण्णा आपल्या चार सहकाऱ्यासह आंघोळ-पाणी न करता जेल मधल्या तटाच्या कडेनं शंका न येईल असे फिरू लागले. अण्णानी न कळत वर पाहिलं. त्याचवेळी त्या बाजूनं फिरत आलेला पोलिस म्हणाला राव वर काय बघताय : जेल बिल फोडायचा विचार आहे काय ? हा जेल अद्याप कोणी फोडला नाही व फोडणं ही शक्य नाही महाराष्ट्रात सर्वात हा अवघड जेल आहे. अशा घमेंडीनं आणि तोऱ्यानं बोलत बोलत तो प्रवेशद्वाराकडे निघून गेला. पुन्हा परत आला नाही त्याचवेळी नागनाथ अण्णानी जेल फोडला हे ऐकून तो आश्चर्यचकित झाला !

आण्णाना हे त्याचं बोलण अधिकच प्रोत्साहन दायक ठरलं. नागनाथ अण्णा मनामध्ये अधिकच चिडले. त्या पोलिसाला ते एकही शब्द बोलले नाहीत. बोलण्यापेक्षा वृत्तीला फार महत्त्व होते. अण्णा क्रांतिवीर होते. बोलण्यापेक्षा ते कृतीला अधिक महत्त्व देतात. सर्वजण अंधुक प्रकाशात आप आपला सकाळचा कार्यक्रम उरकण्याच्या घाई गडबडीत होते. नाग-नाथ अण्णा मात्र जेल फोडण्याच्या गडबडीस लागले होते. प्रथम त्यांनी तटाकडे तोंड करून सशक्त पैलावानास खाली बसविले व त्याच्या खांद्या-वर चौघाना बसवून शेवटी स्वतःवर उभे राहिले. एवढा बोझा घेऊन तो पैलवान हळूहळू उभा राहिला. अण्णांचे हात तटावर पोहोचण्यास दोन-तीन इंच उंची कमी पडली परंतु ते निराश झाले नाहीत.

थोड्याश्या प्रयत्नाने त्यांना तटाचा वरचा मार्ग सापडला. लगेच उशी घेऊन ते तटावर जाऊन बसले! यावेळी साडे पाच वाजले असावेत. साथीदार तिथून लगेच पसार झाले. आप-आपला सकाळचा कार्यक्रम उरकण्याच्या नादास लागले. त्यात एस. वी. पाटील सहाय्यक होते. नागनाथ अण्णा ज्या बाजूला पलीकडे उडी मारणार होते, तो मार्ग नैसर्गिक पणे कमी उंचीचा होता. परंतु त्या तटा पासून शंभर दोनशे मिटर अंतरावर पोलिसांची घरे भरपूर होती. नागनाथ अण्णाना पाहिले की अद्याप कुठल्याही पोलिसाच्या कोठडीचे दार उघडलेले नाही. परंतु उडी मारल्यावर कदाचित आवाजाच्या योगाने एखादा जागा होऊन दार उघडले तर मात्र आपली धडगत नाही. म्हणून त्यानी तटावर क्षणाचाही विलंब न लावता पटकन मांजरासारखी उडी खाली मारली आणि तिथंच बसून बारीक बारीक हरळी उपटू लागले. कुणी पाहिलं व एखाद्याला शंका आलीच तर हा माणूस गणपतीला हरळी (दुर्वा) उपटत आहे असं वाटावं कारण त्यावेळी घरोघरी गणपती बसविले होते. यावरून अण्णा हे किती समय सूचक होते हे दिसून येईल. एक-दोन मिनिट दुर्वा उपटण्याची कृती करीत करीत नागनाथ अण्णानी इकडे तिकडे निरखून पाहिलं. अद्याप कुणी जागं नाही व आपल्याला कुणी पाहिलं नाही हे जाणून तिथून त्यानी उठून शहराचा रस्ता धरला. अंगावर कैद्याचा गणवेश असल्याने त्याना चट-कन कुठं तरी जाऊन हा गणवेश बदलणे जरूरीचे होते. तटावरील काचांनी हाताला रक्त आले होते. परंतु त्या जखमेवर मातृभूमिच्या मातीचे मलम चोळून रक्त थांबवले होते. साताऱ्यात कुणाच्या घरी जावं याचा विचार त्यानी केला नाही, कुठंतरी लपणं जरुरीचं आहे असं त्याना वाटत होतं. रस्त्याच्या कडेलाच एक घर उघडे दिसले. आत एक गडी झाडलोट करीत होता. सोप्यात चौपाळा होता. अंधुकप्रकाशामध्ये गड्या-शिवाय दुसरे कोणी नाही हे अण्णानी पाहिलं. दारावर पाटी लावली होती. अंधुक प्रकाशात फक्त शेवटी वकील शब्द दिसला. आत जाऊन गड्याला विचारलं वकील सो आहेत काय? गडी म्हणाला, "आहेत पण झोपले

आहेत. कोण तुम्ही ? काय काम आहे ? " नागनाथ अण्णा आत चौपाळ्या-वर जाऊन बसले. परंतु समोर पंचमजॉर्जचा फोटो पाहून चटकन उठले. त्यानी ओळखलं की हे इंग्रज सरकारचे पक्के चहाते असले पाहिजेत. इथं आपण थांबणं म्हणजे स्वतःला पकडून देण्यासारखं आहे. हे त्यानी त्या घरातील फोटोवरून ओळखलं आणि झटकन निर्णय घेऊन गड्याला म्हणाले की, "वकील साहेबांच्याकडं माझं कोर्टाचं महत्त्वाचं काम होतं; मी पुन्हा येईन." असे सांगून तिथून नाव गाव काही न सांगता घरा-बाहेर पडले. तो बिचारा आपलं काम करीतच होता. नागनाथ अण्णांच्या अंगी दूरदृष्टी, मुत्सद्देगिरी, समयसूचकता, हजरजबाबीपणा योग्य व पक्का निर्णय घेण्याचा गुण असल्याने ते झटकन त्या घरातून बाहेर पडले.

आता अण्णा बेधडक सातारा शहरात घुसले. साधारण सहाची वेळ असावी. लोक जागे होत होते. सातारा शहरात अण्णांची ओळख नव्हती. कुणाच्या घरी जावं ? कुठं आपल्याला सुरक्षितता मिळेल ? याचा विचार करीत रस्त्याच्या कडेने झपाझप चालले होते. आता ते सोमवार पेठेत आले होते. अचानक कर्मवीर अण्णांच्या घराजवळ आले. दारावर पाटी होती. रयत सेवक सोसायटी. नागनाथ अण्णांचे पाय तिथं थबकले. दार अर्धवट उघडे होते. बाहेर व्हरांड्यात कॉटवर मच्छरदाणी लावलेली दिसली. आत वाकून पाहिले, कॉटवर कोणीच नव्हते. समोर कर्मवीरांचा फोटो पाहिला त्यांना हिमालयासारखा आधार वाटला. आत जाऊन विचारले अण्णा घरी आहेत का ? आतून मावशी बाहेर आल्या "कोण पाहिजे तुम्हाला ? नागनाथ अण्णा म्हणाले अण्णा हवेत." "ते पुण्याला गेलेत. काय काम आहे ? कोण तुम्ही ?" अण्णानी काम व नाव टाळलं आणि बोर्डींगचे सुपरींटेंडेंट सो कुठं रहातात ? त्याना एखाद्या मुला करवी बोलवता का ? नागनाथ अण्णा म्हणाले. मावशींनी एका मुला करवी ए. डी. अत्तार साहेबाना बोलवून घेई पर्यंत नागनाथ अण्णा कॉटवर मच्छरदाणीत गाढ झोपले. डराडर घोरू लागले. स्वातंत्र्यासाठी जिवाची पर्वा न करता जेल फोडून आलेला हा ढाण्या वाघ बंदुकधारी पोलिसांचा ससेमिरा शोध काढीत

येणार याची जाणीव असताना हा क्रांतीवीर कॉटवर गाढ झोपी गेला होता. याचे आश्चर्य शंकरराव सुखटणकर व अब्दुलगणी अत्तार याना वाटणे साहजिक होते. त्यावेळी संस्थेची सर्व जबाबदारी सुखटणकर साहेबांचेवर असल्याने त्यांनाही बोलावून आणले होते. दोघांनी जेलच्या वेशात कॉटवर झोपलेल्या नागनाथाला पाहून थक्क झाले. त्याना उठवले आणि खरा प्रकार काय आहे तो त्यांनी विचारला. नागनाथ अण्णानी स्पष्ट सांगितलं मी जेल फोडून आलो आहे. जेलमध्ये खितपत पडून राहून मला देशाचं खरं खुरं कार्य करता येणार नाही. म्हणून मी हा सातारचा जेल फोडून आलो आहे. पुढचे मार्गदर्शन व योजना आपण सत्वर आखावी. अब्दुलगणी अत्तार सो जात्याच क्रांतिवादी मताचे व त्यांचा पिंडही क्रांतीचा होता. नागनाथ अण्णाचं धाडस पाहून ते म्हणाले "माझ्या जिवात जीव आहे तो पर्यंत तुमच्या केसालाही धक्का लागू देणार नाही !" शाब्बास ! बहाद्दर ! म्हणून त्यांची पाठ थोपटली शंकरराव सुखटणकर सो हे विचारी, धोरणी, धाडसी, मुत्सद्दी, हुशार व्यक्ती आहे. त्यानीही नागनाथांची तारीफ केली व गणी अत्तारना सांगितलं की नागनाथांचा सुगावा इथ लागला तर संस्थेवर फार मोठा दोष येईल. कर्मवीर इथं नाहीत, इंग्रज सरकार कदाचित संस्था नामशेष करावयास मागे पुढे पहाणार नाही आणि असंख्य गरीबांची मुलं शिक्षणापासून वंचित राहतील. तेव्हा यांना त्यांचे साथीदार साहेबलाल सनदे यांच्या खोलीवर सत्वर पाठवा. नागनाथ अण्णांना दोघांचे विचार पटले. त्यांनी नागनाथाना लेखक मित्राच्या खोलीवर पाठवले व मार्गदर्शन करून निघून गेले.

आता ही जबाबदारी मी व माझा सहकारी म. ग. पाटील या दोघां-च्यावर येऊन पडली. आम्ही दोघे कॉलेज मध्ये शिकत होतो. हा मित्र माझा पार्टनर होता. तोही वडूजच्या गोळीबारा मधील साहसी स्वा. सैनिक होता. यानेही मला उत्तम रितीचे सहकार्य दिले. हा मित्र जिवाला जिव देणारा होता. स्वातंत्र्यासाठी छातीवर गोळ्या झेलणारा मित्र खोलीत असल्याने मला फार मोठा आधार वाटत होता.

आम्ही साताराला सोमवार पेठेत येवलेकर बिल्डींग मध्ये तिसऱ्या मजल्यावर एका खोलीत रहात होतो. ती खोली सहजासहजी कुणाला सापडणं अशक्य होतं. नागनाथ अण्णाना माझे पाटील मित्राची ओळख करून दिली आणि त्याना संपूर्ण थोडक्यात कल्पना दिली. नागनाथ अण्णा कोणत्या परिस्थितीत आपल्याकडे आले आहेत व आपण यापुढे त्यांना कसं कुठं केव्हा सुरक्षित ठेवायचं याचा आराखडा ठरवला. प्रथम मी अण्णांचा जेल मधला ड्रेस बदलला व माझा कॉलेज मधील वेष देऊन त्यांना साहेब बनवले. त्यामुळे त्यांना कोणी ओळखणे अशक्य झाले. अण्णा म्हणाले आता मी तुमच्या ताब्यात आहे, तुम्ही सांगाल त्या-प्रमाणे वागायचं मात्र इंग्रजांचे पोलिस खात्यास सापडायचं नाही, याची दक्षता घेतली पाहिजे अण्णांना आम्ही केलेले जेवण खाऊ घातलं व "तुम्ही खुशाल झोपा आतून कडी लावा. आम्ही बाहेरून खोलीला कुलुप घालून जातो आणि सातारा शहरात गुप्तचर व पोलिसांची काय हालचाल आहे याची संपूर्ण माहिती घेऊन येतो. नंतर काय करायचे हे निश्चित ठरवतो." असे सांगून आम्ही दोघे मित्र सातारा शहरात कानोसा घेत पोलिसांच्या हालचाली पहात फिरत फिरत जेल जवळ असलेल्या पोलिस कार्यालयाच्या जवळ पास बावळट वेशात बावळटा सारखे फिरत होतो.

सर्व सातारा शहरात शस्त्रधारी व निशस्त्र पोलिसांची सारखी धावपळ सुरू होती. गुप्त पोलिस तर साध्या वेशात सर्वत्र फिरत होते. कोणी हॉटेलात तर कोणी दुकानातून तर कोणी जवळ पासच्या घराघरात शिरून घरेदारे तपासत होती. कोणी पुलात वाकून पहातो आहे तर कोणी जेल जवळच्या घराच्या माडीवर, संडासातून, तर कोणी टोपल्या तपासीत होते, तर कोणी मोठमोठ्या पेट्या तपासीत असल्याचे दिसून आले, मुख्य हेड-क्वार्टर जवळ जाऊन पहातो तर आत सर्व पोलिसांना बिगुल वाजवून बोलावले होते. प्रत्येकाच्या तुकड्या पाडून अधिकारी त्याना कुठं पाठवत होते याचा पत्ता नाही. इतक्यात भराभर बेळगावहून शस्त्रधारी पोलि-सांच्या लॉऱ्या भरभरून येत होत्या आणि त्यांची ताबडतोब रवानगी सर्व सातारा शहरा भोवती वेढा देण्याचे कामावर केली जात होती.

सातारा हेड क्वार्टर्सचे सर्व पोलिस आसपासच्या गावी पाठविले जात असल्याचे दिसून आले. अशा प्रकारे एकच गोंधळ, एकच गडबड, एकच धावपळ, एकच बंदोबस्त केला जात होता. प्रत्येक सी. आय. डी. पोलिस नागनाथ अण्णांचा फोटो घेऊन पडताळून पहात होता. अधिकाऱ्यांच्या अंगावर शहारे उभे राहिले होते.

पाटील व मी दोघे जवळच असलेल्या एका हॉटेलात चहा पिण्याचे निमित्त काढून आतल्या खोलीत जाऊन बसलो. तोच त्या ठिकाणी सी. आय. डी. खात्यामधील माझा एक मित्र अशोक आला. मी त्याला पाहून थक्कच झालो. तो माझा मित्र असल्याने तो माझ्या जवळ चहापीत गप्पा मारीत बसला. त्याचे हातात एक फोटो होता. "मी म्हणालो अरे अशोक तुझ्या हातात काय आहे ? पाहू बरं कुणाचा फोटो आहे तो, काय बहिणीचं लग्न बिग्न ठरवलंस काय ?" अरे बहिणीचं लग्न तुला सोडून करीन का ? अरे हा फोटो एका वीर पुरुषाचा आहे हा बघ, म्हणून त्याने मला नागनाथ अण्णांचा फोटो दाखवला. हा फोटो घेऊन तू का फिरायला लागला आहेस ? अरे ! या वीर पुरुषांनं साताऱ्चा अती अवघड जेल सकाळी पाच-सहाच्या सुमारास फोडून अचानक निघून गेला आहे. त्याला शोधण्यासाठी आम्ही सर्व सी. आय. डी. पोलिस हा फोटो घेऊन फिरत आहोत. संशयावरून सुद्धा आम्ही कुणालाही अटक करू शकतो. सर्व पोलिसांच्या तुकड्या प्रत्येक गावोगावी पाठवल्या आहेत. पोलिस कमी पडले म्हणून बेळगांवहून एकहजार शस्त्रधारी पोलिस मागवले आहेत आणि त्यानी सातारा शहराभोवती वेढा दिला आहे. सातारा शहरात तपास सुरू आहे. संशयावरून गोळी घालण्याचा आदेशही इंग्रज सरकारनं पोलिसाना दिले आहेत. मी म्हणालो यांचं नाव काय, हे कुठल्या गावचे वीर पुरुष आणि यानी जेल का फोडला ? अरे ! यांचं नाव नागनाथ नायकवडी, हे वाळवा गावचे क्रांतिवीर, सात-आठ दिवसापूर्वीच यांना अटक केली होती. हा फार मोठा धाडसी वीर आहे. खास इंग्रज सरकारनं याला पकडण्यासाठी इंग्लंडहून त्यांच्या सैन्यामधील कॅप्टन अधिकारी हिंदुस्थानात पाठवला होता, परंतु

तो सापडला घरभेदीपणामुळे. चार-आठ दिवसांतच सातारा जेल फोडून इंग्रज अधिकाऱ्याचा पराभव केला. याला म्हणायचा भारतामधला वाळव्याचा क्रांतिवीर स्वातंत्र्यसैनिक, स्वातंत्र्यासाठी तो आपल्या प्राणाची पर्वा करणारा नाही. जेलमध्ये खितपत पडणे त्याला आवडले नाही म्हणून त्यानं जेल फोडला. शाब्बास बहाद्दर असे म्हणून त्याने तो फोटो स्वतःच्या खिशात ठेवला.

आंधळा मागतो एक डोळा मिळाले दोन अशी एक म्हण आहे आम्ही ज्या उद्देशाने बाहेर पडलो होतो त्यामधली थोडी बहुत माहिती मिळेल, त्यावरून आमची पुढची योजना यशस्वी करणार होतो परंतु या मित्राकडून संपूर्ण माहिती मिळाल्याने आमचा पुढील मार्ग सुखकर झाला म्हणावयास हरकत नाही. नागनाथ हे माझे लंगोटी मित्र व सहकारी आहेत हे त्याला काय माहित ? आम्ही काय उद्देशाने फिरत इथं आलो होतो ते त्याला आम्ही सांगू शकत होतो का ? आमचा चेहरा अगदी निर्विकार होता आम्हा दोघांच्या मनात अगदी गुदगुल्या होत होत्या. मी मनात म्हणालो, "हा सी. आय. डी. मित्र किती बावळट आहे. हा जातीवंत सी. आय. डी. नाही." अन् तो एवढे सांगून आपल्या पुढच्या कामासाठी इतरांच्या-प्रमाणे नागनाथ अण्णांचा तपास करण्यासाठी निघून गेला. पुन्हा भेटला नाही.

आम्ही दोघे मित्र त्या हॉटेल मधून अशोकचा निरोप घेऊन निघालो. अधिक वेळ घालवला तर हा तपास आपल्या सोमवार पेठेपर्यंत येणार. १० सप्टेंबर १९४४ चा तो दिवस होता. दिवस कसा जाईल याची मला चिंता वाटत होती. यदाकदाचित् हे तपासाचं सत्र आपल्या खोलीपर्यंत आलं तर ? आम्ही दहा-अकराचे सुमारास आमच्या खोलीचे कुलुप काढले आणि दार लावून घेतले. नागनाथ अण्णा वर्तमानपत्र वाचीत बसले होते. आम्ही त्यांना सातारा शहरातली सर्व हकीकत सांगितली. त्यानी एकच सांगितलं "यापुढे साहेबलाल जी योजना आखतील त्याप्रमाणे चालायचं, त्यात आपलं बरं वाईट काही झालं तरी मागे पुढे पहायचं नाही.

सकाळचे बारा वाजल्यापासून माझा मित्र महादेव प्रवेशद्वाराजवळ पहारा करीत बसला होता. कोणी आलाच तर तिसऱ्या मजल्यावरच्या आमच्या खोलीवर चटकन येऊन बातमी द्यावी म्हणजे खोलीमधून अण्णांना अन्यत्र हलविता येईल. सायंकाळचे सात-आठ वाजले तरी सी. आय. डी. अगर पोलीस कोणी अद्याप इथपर्यंत येऊ शकले नव्हते.

रात्री अकरा-बाराचे सुमारास या खोलीमधून सातारा शहराचा सशस्त्र पोलीसांचा वेढा पार करून जाण्याचा आम्ही तिघांनी निर्धार केला. श्री शिवाजी महाराजांनी जशी आगऱ्याहून सुटका करून घेतली तद्वत नागनाथ अण्णांची साताऱ्याहून सुटका करायची होती. इंग्रजांनी दिलेल्या या वेढ्यामधून सहजा-सहजी सुटणं अशक्य होतं. सापडलो तर तिघांनाही प्राणास मुकावे लागणार याची जाणीव तिघांनाही होती. 'आस्मानसे टपका और खजूरमे अटका' अशी अवस्था नागनाथ अण्णांची झाली होती. त्याच बरोबर आमची ही.

रात्रीचे दहा वाजले आम्ही तिघांनी यथेच्छ जेवण केलं. भारतमातेचं नाव घेऊन खोलीला कुलुप लावून तिघेजण बाहेर पडलो. जाण्याचा मार्ग आम्ही निश्चित केला होता. हातात एक लहानशी बॅटरी होती परंतु त्याचा उपयोग फारसा करायचा नव्हता. नाही म्हणायला आकाशात चतुर्थीच्या चंद्राचा अंधुक प्रकाश होता. आम्ही तिघेजण साताऱ्यामधील शाहू बोर्डींग जवळच्या धनणीनीच्या बागेच्या पश्चिम दिशेकडून निघालो. यावेळी रात्रीचे बारा वाजले असावेत. या बागेच्या दक्षिणेस भला मोठा टेकडीचा उतारभाग पूर्व दिशेला मेढ्याकडे जाणाऱ्या रस्त्यापर्यंत गेला होता या नाक्यावर सशस्त्र पोलिसांचा पहारा होता. यावरून आम्ही अंदाज केला की गावच्या सर्व नाक्यावर असा पहारा असला पाहिजे.

ही टेकडी पार करून सातारा शहराच्या बाहेर जाणं आणि हा वेढा पार करणं अवघड काम होतं, परंतु गेल्या शिवाय दुसरा उपायच नव्हता. चांदण्याच्या अंधुक प्रकाशात आम्ही तिघेजण टेकडी पार करावयास सुरुवात केली. आम्हांस पोलिस पहारा लांब अंतरावर असलेला दिसत

होता, परंतु त्यांना मात्र आम्ही न दिसेल अशा पद्धतीने जाण्यास सुरूवात केली.

शत्रू पक्षास दिसू नये म्हणून सैन्यात जसे जमिनीवरून कोपर व गुडघ्यावर चालतात. (क्राऊलिंग) त्याच पद्धतीने आम्ही ही टेकडी पार करीत पोलिस पहाऱ्या पासून दोन चार फर्लांगाच्या अंतरावर मेढ्याच्या रस्त्याला लागलो. हा वेढा पार करण्याची आमची योजना यशस्वी झाली याचा आनंद आम्हा मित्रांना झाला होता. नागनाथ अण्णांनी या माझ्या चतुराई आणि युक्ती बद्दल धन्यवाद दिले. शक्तिपेक्षा युक्ति श्रेष्ठ आहे हे तत्व त्यांना त्यावेळी चांगल स्पष्ट दिसून आलं. ते म्हणाले इंग्रजानी मला पकडण्यासाठी एवढी मोठी शक्ती पणास लावली आहे की, कुठल्याही प्रकारे साताराचा काना कोपरा शोधून पकडण्याची जिद्द चाल-वली आहे. परंतु या युक्तीनं आज त्यांची शक्ती कुचकामी तर ठरलीच शिवाय त्यांचा आज पराभवही झाला. याचे सर्व श्रेय तुम्हा दोघा मित्राना आहे यात शंका नाही. आम्ही तिघे बोलत बोलत चार मैलाचा रस्ता पार केला होता. आणखी चार पाच मैल चालून आम्हाला नदी पलीकडे असलेल्या काळोशी गावी जायचं होतं. भरलेली नदी रात्रीच्या वेळी पार करून जाण्याचा प्रसंग आमच्यावर आला होता. थोडं अंतर चालून गेल्यावर समोरून लांब अंतरावर आम्हाला मोटारची लाईट दिसली. आम्ही कल्पना केली रात्री एक दीडच्या सुमारांस मेढ्याकडून सातारला येणारी पोलिस लॉरी असावी. आता आपण तिघही सापडणार. हा विचार सत्वर येता क्षणीच आम्ही तिघेजण रस्ता सोडून केकताडाचे दाट तटाच्या कडेला असलेल्या लांब लचक खड्डयात थोडा वेळ लपून राहिलो. लॉरी भरधाव निघून गेली. पुन्हा रस्त्यावर येऊन भरभर चालू लागलो. समोरून काही अंतरावर बैलगाडी इकडे येत असल्याचा गाडीचा आवाज व बैलांच्या गळ्या मधील घुंगुरांचा आवाज आला. नागनाथ अण्णा म्हणाले शेतकरी गाडी घेऊन सातारा शहरी जात असेल तरी सुद्धा अशा अपरात्री आपण तिघे शाळेचा विषय काढून आपआपसात बोलत जाऊ म्हणजे तो आपणांस कोण आहे? कुठ चाललांत? वगैरे

चौकशी करणार नाही आणि आपण आपल्या भारतीय शेतकऱ्यास भिण्याचे कारण नाही. त्याप्रमाणे आम्ही बोलत निघालो होतो. शाळा किती चांगली होती, गुरुजी उत्तम शिकवत होते, शाळा बांधली पाहिजे वगैरे वगैरे. गाडी जवळ आली परंतु आम्ही आमच्या बोलण्यांत दंग असल्याने त्या गाडीवानाने आम्हाला काहीच विचारले नाही आम्हीही त्याला विचारले नाही. सात-आठ मैल चालून आल्यावर जवळपास असलेला एक फाटा काळोशी गावी जात होता परंतु हा मार्ग जंगला मधून नदीकाठापर्यंत जात होता. उंच उंच गवत असलेल्या पाऊल वाटेने आम्ही तिघे निघालो. या जंगलामधून दिवसा जाताना मनुष्य भित असे. त्या जंगलामधून साप, विंचू, काटा इत्यादी व हिंस्त्र प्राणी यांची पर्वा न करता आम्ही तिघे निघालो होतो. स्वातंत्र्याची किंमत जगात कुणाला करता येत नाही. आम्ही, क्रांतिवीर स्वातंत्र्यसैनिक नागनाथ अण्णांच्या बरोबर होतो. मग भीती कशाची ?

जंगलामधून रातकीड्यांचा आवाज येत होता, गवतामधून सळसळत धावणाऱ्या सर्पाचा सुगावा कळून येत होता. आम्हाला या कशाचीही पर्वा वाटत नव्हती. अर्धा मैल गेल्यावर नदीचा पाणवठा आला. नदीला भरपूर पाणी होतेच, परंतु या कोकणामधल्या नद्याना ओढ फार होती व ती वेण्णानदी खळखळ वाहात चालली होती. आता ही नदी पार करून पलिकडे असलेल्या काळोशी गावी आम्हाला रात्री दोन वाजता जाण्याचा प्रसंग आला होता. जेल फोडणं हे जसं अति अवघड व अशक्य काम होतं त्याहूनही अधिक ही वेण्णा माई नदी पार करून जाणं अवघड होतं. नागनाथ अण्णांच्या वाळवे गावी कृष्णानदी असल्याने त्यांना महापूर पोहून जाण्याचा सराव होता. त्याच प्रमाणे आम्हा दोघा मित्रानाही याच नदीत पोहण्याचा सराव होता. ही वेण्णानदी रात्री पार करून जाणं थोडं अवघड काम होतं. त्यात या वेण्णानदीच्या पाण्याला ओढ होती. त्यामुळे मन थोडं कच खाणं सहाजिकच होतं. परंतु इलाज नव्हता. आम्ही कपडे काढून डोकीला बांधण्याची तयारी केली. अंगामध्ये ताकद होती, व पोहण्याची कलाही चांगली अवगत

होती, नागनाथ अण्णा व मी नेहमी आष्टा गावच्या चव्हाणवाडी वरील तालमीत नियमित व्यायाम करत होतो. कुस्त्या खेळत होतो. परंतु या ठिकाणी पाण्याबरोबर कुस्ती खेळायची व शक्ती दाखवायची म्हणजे मृत्यूशी झुंज खेळण्याचा बाका प्रसंग ओढवला होता. शेवटी नागनाथ अण्णा म्हणाले "हे पहा साहेबजी, महादेव मी जेल फोडून सहीसलामत बाहेर आलो. तुमच्या युक्तीनं इंग्रजांच्या पोलिसांच्या शक्ती प्रदर्शनाचा वेढा फोडून सहीसलामत तिघे बाहेर पडलो, यातूनही वाचलो आहोत. आता ही वेण्णा नदी पार करावयाची आहे. भारत मातेला आपल्या पुत्रांकडून सेवा करून घ्यायची असेल तर ती आम्हां तिघानाही यामधून वाचवू शकेल. तिला या युगात दिमाखानं वहात जायचं असेल, तिलाही आपलं स्वातंत्र्य पहावसं वाटत असेल तर ती आम्हाला जगवील नाहीतर मारून टाकील. आपण मेलो असतो तर या दोन प्रसंगामध्येच मेलो असतो. तिला आम्हाला देशसेवेसाठी जगवायचं आहे हे निश्चित. तेव्हा आपण तिघही साखळी करून भारतमातेचे नाव घेऊन पडू या. घाबरून जाऊ नका. पाणी कसं तोडायचं हे आपणाला माहित आहे. आपण तिघं वाळवे तालुक्यामधले आहोत. आपण आपलं पाणी इंग्रज सरकारला दावू या. नागनाथ अण्णांच्या या बोलण्यानं आमचा उत्साह व आनंद गगनात मावला नाही. आम्ही तिघानी भारतमाता की जय म्हणून पाण्यात उड्या टाकल्या. पाणी कापीत कापीत तीन चतुर्थांश भाग पोहून आलो होतो. पाण्याला ओढ असल्याने आम्ही तिघेही दमलो होतो. हातपाय काम देत नव्हते. थोडावेळ तिघंही प्रवाहाबरोबर वहात गेलो. पुन्हा वेगाने पाणी कापीत कापीत नदीच्या काठाला आलो, काठावर बसलो. कुणालाच दहा-पंधरा मिनीटे दमल्यामुळे बोलता येत नव्हते. डोकीला गुंडाळलेले कपडे काढून अंगात घातले. अर्धा तास विश्रांती घेतली. या संकटातून वाचल्यामुळे भारतमातेचे आभार मानले. व नागनाथ अण्णांना मी म्हणालो, "अण्णा, देव तारी तया कोण मारी, नदीला सुद्धा स्वातंत्र्याची स्वप्नं पडत असावीत. स्वातंत्र्यासाठी प्राण पणाला लावणाऱ्या सुपुत्रांच्या प्राणाला तिनंही दगाफटका होऊ दिला

नाही. आपण सहिसलामत काठावर आलो." नागनाथ अण्णा म्हणाले, "या वेण्णा माईला सुद्धा आपल्या पुत्रांना पारतंत्र्याचं पाणी पाजण्याची इच्छा दिसली नाही. भारतमाता लवकर स्वतंत्र व्हावी अशीच तिची इच्छा आहे. आपलं स्वातंत्र्य जवळ आलं आहे हे निश्चित आहे." असे म्हणून आम्ही तिघानी वेण्णा माईस नमस्कार केला व जवळच असलेल्या काळूशी गावचा रस्ता धरला. तीन साडेतीनची वेळ असावी. आम्हाला या गावामध्ये व्हॉलंटरी शाळेचे शिक्षक बोगर गुरुजी यांच्या घरी जायचं होतं. ते आमचे मित्र होते. सातारला वरचेवर येऊन आमची भेट घेत होतेच. आम्हीही वरचेवर जात येत होतोच. तेही वाळवे तालुक्यामधील येलूर गावचे राहणार होते. त्यांचा या गावात चांगला दबदबा होता. ते गावच्या पोलिस पाटलाच्या घरी रहात होते. मी दार खटखटवले. बोगर गुरुजी म्हणून हाक दिली. गुरुजी ताड्कन जागे झाले. एवढ्या रात्री नदीपार करून आम्ही आलो हे पाहून ते थक्कच झाले! "एवढ्या रात्री कसे काय आलात?" गुरुजी म्हणाले. आता हे पोलिस पाटलाचं घर होतं त्यामुळे बोगर गुरुजीना आम्ही म्हणालो, "हे आपल्या संस्थेचे नवीन भागाधिकारी (इन्स्पेक्टर) आहेत. या भागामधील शाळा पहावयाच्या आहेत शिवाय इन्स्पेक्शन घ्यायचं आहे. बोगर गुरुजींनी नागनाथ अण्णाना (साहेबांना) नमस्कार केला.

आम्ही पोहून आल्यामुळे दमलो होतो. भरपूर व्यायाम झाला होता. गारठलो होतो. भूकही लागली होती. गुरुजींनी तावडतोब स्टोव्हवर चहा करून दिला. चहा पिऊन थोडा वेळ आडवे झालो. तोपर्यंत कोंबडा आरवला. तासभर विश्रांती घेतली. एवढ्या वेळात बोगर गुरुजींनी भात भाकरी कालवण तयार केलं होतं. आम्ही चौघेजण यथेच्छ जेवलो. शरीरात चांगला उत्साह निर्माण झाला. शाळेच्या प्रगतीची चौकशी करीत करीत मी गुरुजींना हलक्या आवाजात विचारले, "काय गावात कमी जास्त गडबड-बिडबड?" गुरुजी म्हणाले गावामध्ये कुठलीही घटना झाली, किंवा काही कमीजास्त असलेच तरते मला इथं तावडतोब कळतं. कारण पोलीस पाटलाचं हे घर, कोणीही अधिकारी आला तर प्रथम इथं येऊन

काही कमीजास्त असल्यास विचारतो आणि पो. पाटील हे माझ्या विचाराशिवाय कुठलीही गोष्ट करीत नाहीत. दुपारी मामलेदार सो येऊन गेले. त्यांनी पो. पाटलांना विचारले गावात कोणी नवखा माणूस आला आहे काय ? कारण नागनाथ नायकवडी यानी सातारचा जेल फोडला आहे. तेव्हा सरकारनं सातारच्या आसपासच्या सर्व गावामध्ये तपास करण्याचा आदेश दिला आहे असे मामलेदार सो पोलिस पाटलांना म्हणत होते." गुरुजी म्हणाले पोलिस पाटलानी त्याना सांगितले "इथे कोणी नवखा पुरुष आला नाही. आला तर आम्ही कळवतो. आपण निर्धास्त जा" व त्याप्रमाणे लेखी रिपोर्टही मामलेदाराच्या हाती दिला आहे."

आम्हाला जे नको होतं तेच पुन्हा या ठिकाणी ऐकावयास मिळालं. वायुवेगाने सरकारच्या सर्व जिल्हाभर हालचाली चालू झालेल्या होत्या यात शंका नाही. आता आम्ही नागनाथ अण्णाना शाळा तपासणारे इन्स्पेक्टर साहेब बनवलं होतं. बोगर गुरुजींना खरी कल्पना कुठल्याही प्रकारे दिली नाही. सत्य अंधारातच ठेवलं होतं. काही काळ ठेवणं जरूरीचं होतं. येवढ्या लवकर साहेब कोण हे त्यांना सांगण्याची गरज नव्हती. "तुमच्या शाळेचे इन्स्पेक्शन चार सहा दिवसात घेतलं जाईल तुम्ही तयारी ठेवा. साहेब या भागात आहेतच." एवढीच गुरुजींना आम्ही यावेळी सुचना दिली आणि गुरुजींचा निरोप घेऊन एकीवच्या उंच डोंगरावरच्या शाळेकडे जातो असे सांगून सकाळी साडेपाच वाजता निघालो. जाता जाता मी गुरुजींना सूचना दिली की, "शाळा तपासणारे साहेब आलेत हे तुमचे घरमालक पोलिस पाटील याना मुळीच सांगू नका आणि येवढ्या रात्री आम्ही सुद्धा आलो होतो याचीही कल्पना देऊ नये. तुमची खोली त्यांच्या घरापासून स्वतंत्र आहे ही फार चांगली गोष्ट आहे. तुम्ही सातारला आल्यावर काही गोष्टी आपण बोलू" असे सांगून आम्ही डोंगर चढावयास सुरुवात केली.

सह्याद्री पर्वताचा एक फाटा इथपर्यंत आलेला होता. हा डोंगर बराच उंच, अवघड आणि विस्तृत प्रमाणात पसरलेला होता. याच्या

पश्चिमेकडील बराच मोठा भाग जंगल, दऱ्या-खोऱ्या, वेली, मोठाले वृक्ष, हिंस्त्र प्राणी, पशुपक्षी यांनी व्यापून गेलेला होता. एकीवच्या डोंगरावर (कासचा) आम्ही तिघे चढून गेलो. या ठिकाणच्या शाळेवर आमच्या वाळवे तालुक्यामधील शिगांव गावचे भगवान पाटील शिक्षक माझे मित्रच होते. प्रत्येक शिक्षक हा त्या गावचा जणू राजाच होता. या डोंगर माथ्यावर, दऱ्याखोऱ्यात सुद्धा कर्मवीरांच्या पाच-सहाशे व्हॉलंटरी शाळा होत्या. त्यापैकी काही शाळा पहाण्याची संधी नागनाथ अण्णाना अनायासे मिळाली होती. कर्मवीरांचं भरीव कार्य पाहून नागनाथ अण्णा भारावून जाणे साहजिकच आहे. गावच्या सुरुवातीलाच ही व्हॉलंटरी शाळा दिसली. सकाळचे सात वाजले असावेत. सूर्याच्या कोमल किरणानी जणू सोन्याचा मुलामा या हिरव्यागार भागावर चढवला आहे असा भास होत होता. गवताच्या लहान लहान उतरत्या छपरांच्या झोपड्या पाहून खऱ्या कोकण भागाची कल्पना येऊ लागली. हे गाव कसलं! ही लहानशी वस्तीच म्हणायची ! शिवाजी महाराजांच्या वेळचे हे स्वातंत्र्यासाठी लढणारे प्रामाणिक मावळे यांच्या सहवासात नागनाथ अण्णाना काही दिवस ठेवायचं असं ठरवलं होतं. हा जवळ जवळ अज्ञातवासच होता. असे म्हणायचे कारण की अशा ठिकाणी चुकूनही कोणी सरकारी अधिकारी वगैरे येत जात नव्हते. भगवानराव गुरुजींची झोपडी गावाच्या बाहेर एकांतात होती. आम्ही तिघेजण गुरुजींच्या घरी अगदी सकाळच्या प्रहरी गेलो. गुरुजी उठले होतेच. त्यांनी आमचं स्वागत केलं. आम्ही साहेबांची (नागनाथ अण्णांची) ओळख करून दिली. गुरुजींनी ताजं दूध गरम करून प्यायला दिलं. एवढ्या लवकर आम्ही आल्याबद्दल गुरुजींना आश्चर्य, कुतुहल, नवल वाटणे साहजिक होते. अण्णांना या ठिकाणी बराच काळ ठेवणे भाग असल्यामुळे थोड्या इकड-तिकडच्या गप्पा झाल्यावर त्याना खरा प्रकार काय आहे, हे साहेब कोण? त्यांनी काय केले आहे, काय धोका आहे तुम्ही काय केलं पाहिजे? याची कल्पना दिल्यावर त्यांनी अण्णांचे सुरक्षिततेची, राहण्याची, खाण्यापिण्याची सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेतली व मला वचन दिलं की मी अण्णांची

सर्व जबाबदारी पार पाडतो, तुम्ही निर्धास्त रहा! हे मी माझे कर्तव्यही समजतो. असे म्हणून त्यांनी नागनाथ अण्णांच्या चरणांस स्पर्श केला. प्रत्येक व्हॉलंटरी शाळेवरचा हा शिक्षक त्या गावचा 'राजा' होता. त्यांच्या विचाराशिवाय गावचे पान हलत नसे. कोणी सरकारी अधिकारी आलाच तर प्रथम गुरुजींना भेटून गावात काय कमी जास्त आहे हे विचारून निघून जात असे. या ठिकाणी सरकारी अधिकारी वर्षातून एखादेवेळी येत असे. तेव्हा या ठिकाणी कशाचीही भीती नव्हती. भगवान गुरुजींच्या सहवासात नागनाथ अण्णांना आम्ही ठेऊन परत सातारला येण्यासाठी जेवणखाण करून दुपारी एकच्या सुमारास निघालो. 'भगवान तारता है उसको कौन मारता हैं!, अशी एक हिंदीत म्हण आहे. परत येताना अण्णांनी आम्हाला सूचना दिली की इंग्रज सरकारचे सी. आय. डी. खाते फार मोठे व जबरदस्त आहे. संशयावरून तुम्हा दोघांपैकी कुणाला जर पकडलंच तर एक दुसऱ्याचं नाव घेऊ नका. ज्याच्यावर प्रसंग आला त्यानेच तो निभवावा. दुसऱ्या मित्राचे नाव घेऊन दोघांचाही घात करून घेऊ नका आणि मी इथं असल्याचा सुगावा सरकारला लागता उपयोगी नाही, यासाठी स्वतःचा प्राण गमवावा लागला तरी त्याची पर्वा करू नका.

आम्ही दोघांनी अण्णांना सांगितले. "अण्णा! त्याची काळजी करू नका. आम्ही दोघांनीही स्वातंत्र्यासाठी प्राण पणाला लावला आहे. आम्ही आमचा प्राण गमावू परंतु तुमच्या केसालाही धक्का लागू नये याची खबरदारी पाळण्यास तयार आहोत." जाता जाता अण्णांनी पुन्हा एक कामगिरी आमचेवर सोपविली, ते म्हणाले की "उद्या सर्व वर्तमानपत्रांमधून भडक बातमी छापून येणार आहे, तेव्हा ते वर्तमानपत्र मला इथं आणून द्यावं." मी अवश्य घेऊन येतो असे सांगून दोघांचा निरोप घेऊन निघालो. एकीवचा एकांत डोंगर उतरून नदीपर्यंत आलो. आता आम्हाला पोहून जाण्याचा प्रसंग आला नाही. नदीत व्हडगं होतं. त्यात बसून पलिकडे गेलो. रात्री नदीत व्हडगं चालवत नव्हते त्यामुळे पोहून येण्याचा प्रसंग आला होता. महादेव पाटील व मी मेढ्याहून येणाऱ्या

एका ट्रकमधून सातारला आलो. गावामध्ये ठिक-ठिकाणी लोक वर्तमानपत्र वाचण्यात गढून गेलेले दिसले. आम्हीसुद्धा ही काय बातमी आहे हे वाचण्यासाठी सकाळ वर्तमानपत्र घेतले. त्यात मोठ्या टाईपमध्ये लिहीलं होतं की "सरकारने मोठ्या महत् प्रयासाने वाळव्याचे क्रांतीवीर नागनाथ नायकवडी यांना पकडलं होतं, परंतु आज पहाटे चार-पाच वाजण्याच्या सुमारास ते सातारचा अति अवघड जेल फोडून निघून गेले. त्यांना पकडण्यासाठी सरकारनं जंगजंग पछाडलं, परंतु ते अद्याप कुणाला सापडले नाहीत." ही बातमी वाचून आम्हा दोघा मित्रांना मनात गुदगुल्या होत होत्या.

ही बातमी नागनाथ अण्णांना मी केव्हा नेऊन वाचायला देईन असं झालं होतं. दुसऱ्या दिवशी मी सकाळ वर्तमानपत्र घेऊन नागनाथ अण्णांना पुन्हा एकीवच्या डोंगरावर नेऊन दिले. अण्णांनी ही बातमी वाचून मला मिठीच मारली व म्हणाले, "साहेबजी आपण सरकारचा पराभव केला की नाही ? आता ते कधी माझ्या वाटेला जाणार नाहीत" मी अण्णांना म्हणालो "अण्णा भारतात असे तुमच्यासारखे वीर आहेत म्हणून हे इंग्रज सरकार मेटाकुटीला आलं आहे."

नागनाथ अण्णांनी आता या पुढची योजना मला सांगितली. "मी आता इथं चार दिवस राहणार आहे. नंतर इथूनच डोंगर दऱ्या खोऱ्या पार करीत मी माझ्या सैनिकी कॅम्प मध्ये जाणार आहे. माझ्या हाती शस्त्र आल्यावर मग मला कशाची भीती नाही. मी कॅम्प मध्ये गेलो की तिथून एक मुलगा तुम्हाला फक्त पाच रुपयाची नोट देऊन परत येईल त्यावेळी तुम्ही निश्चित समजायच की "मी आपल्या कॅम्प मध्ये हजर झालो व सुरक्षित आहे काळजी करण्याचे कारण नाही. या नोट वरून सर्व बोध समजावा. पत्र, चिठ्ठी वगैरे काही त्या मुला कडून मिळणार नाही. फक्त पाच रुपयाची नोट हेच पत्र व चिठी व खुशाली समजावयाची." मी तुम्हांला आपल्या कॅम्प मध्ये सोडून पुन्हा सातारला परत येईन किंवा पुढे कॅम्प मध्येच राहीन असे म्हणताक्षणीच अण्णा म्हणाले "तुम्ही

कॅम्प मध्ये राहू नये. बाहेर राहून संपूर्ण सहकार्य फार चांगल्या प्रकारे करता येते. सरकारच्या सर्व बातम्या आम्हांला तुमच्या मार्फत स्पष्ट व निश्चित खात्री लायक मिळतील त्यामुळे आम्हांला त्या दिशेने काम करणे सुलभ जाईल. तुम्ही या वर्षी तुमचे कॉलेज पूर्ण करा. थोडे दिवस राहिले आहेत. मग तुही आपली परीक्षा संपल्याबर कॅम्प मध्ये या" अण्णाचा सल्ला मला आवडला व मी एका· वच्या डोंगरावरून परत सातारला आलो. आम्हां दोघा मित्रांच्या मना मध्ये एक सारखी आणि एकच हुरहुर लागली होती की आपल्यावर शासनाची सतत टांगती तलवार आहे. कधी सी. आय. डी. येईल व कधी जेल मध्ये जावं लागेल याचा नेम नाही. परंतु नागनाथ अण्णांनी सांगितलेली सूचना आम्ही दोघांनीही कटाक्षाने पाळायचा निश्चय केला होता. दोन दिवस मजेत गेले. तिसऱ्या दिवशी एक अनोळखी मनुष्य माझ्या खोलीवर आला. आम्हा दोघांच्या काळजात धस्स झालं! तुम्ही कोण? तुमचं इथं काय काम आहे? असा मी त्यांना सवाल केला. अनो ळखी मनुष्य वदला " माझ नाव धन्वतंरी वैद्य. माझं गाव कासेगाव. इथं कोणी आजारी नाही औषध वगैरे आम्हांला नको आहे, असं त्याना सांगितलं." " माझ तुमच्याकडे एक महत्त्वाचं काम आहे. तुमचं नाव साहेबजी का? असे विचारता मी आश्चर्यचकित झालो. घाबरलो आणि मनात पक्क ओळखलं की हा सी. आय. डी. आहे. " माझं नाव शरीफ अहमंद आहे. चुकून माझ्या खोलीवर आला आहात दुसऱ्या ठिकाणी या व्यक्तीला शोधा. आम्ही कॉलेजला चाललो आहोत. चला बाहेर आम्हांला कुलुप लाऊ दे." तो मनुष्य खोली मधून जायला तयार नव्हता. तो जागचा हालेना आम्हांला जास्तच शंका येऊ लागली. मी त्याला म्हणालो " तुम्ही जाता का पोलिसला बोलावून आणू" असे म्हणताच तो मनुष्य चटकन म्हणाला " आहो मी कोणी सी. आय. डी. नाही. तुम्हांला शंका येणं साहजिक आहे, माझ्यावर इंग्रज सरकारचं पकड वॉरंट आहे. मला पकडण्यासाडी सरकारनं पाच हजारांच बक्षीस लावलं आहे. म्हणून असा पोशाख (शेतकरी) करून सतत फिरतो

आहे. तुम्ही पोलिसाला बोलवू नका; मी तुमचाच आहे. घाबरू नका नाग-नाथ अण्णा तुमचे जिवलग मित्र आहेत हे मला अण्णांच्या आईनी सांगितलं आहे. अण्णा कुठं आहेत हे मला आधी सांगा. ते खुशाल आहेत का ?" "मी तुमचं काही ऐकणार नाही. तुम्ही कोण आहात हे आम्ही ओळखत नाही. कोण अण्णा हे आम्हाला माहीत नाही. मी त्यांचा मित्र नाही, तुमच्यावर वॉरंट असो अगर नसो आम्ही कॉलेजचे विद्यार्थी आहोत. आम्हाला याच्याशी काही कर्तव्य नाही. आम्हाला वेळ झाला आहे, आम्हाला जाऊ दे. आमचा वेळ व्यर्थ घेऊ नका. तुम्ही दुसरीकडे साहेबजीना शोधा जा."

नागनाथ अण्णांचे नाव घेतल्यावर आमची पूर्ण खात्री झाली की हा निश्चितच सी. आय. डी. आहे. हा काही तरी ढोंग करून आमच्याकडून अण्णा कुठं आहेत हे काढून घेण्यासाठी, आम्हाला धोका देण्यासाठी व आम्हाला फसवायला आला आहे. आता आम्ही संकटात सापडणार, आपले पितळ उघडे पडणार, आपण तिघेही सापडणार असे वाटू लागले.

"देवाशपथ, अल्लाशपथ मी सी. आय. डी. नाही. मी त्यांच्या कॅम्पमधून आलो आहे. त्यांच्या कॅम्पमधील स्वा. सैनिकांना औषधपाणी देण्याचंही काम करीत असतो. त्यानी जेल फोडला आहे. त्याना कुठं हाता-पायाला लागलं असेल तर मलमपट्टी-औषध वगैरे देणं भाग आहे. कॅम्पमधील सर्वांना अण्णांची काळजी लागली आहे. पुन्हा ते पोलिसांना सापडू नयेत याची काळजी घेणं जरुरीचं आहे. ते आपल्या कॅम्पमध्ये सुरक्षित केव्हा येतील याची सर्वांना हुरहुर लागली आहे. तुम्ही माझ्या-वर विश्वास ठेवा आणि तुम्हाला खात्रीच करून घ्यायची असल्यास तुमच्या कॉलेजमध्ये जर एखादा कासेगावचा कोणी विद्यार्थी असला तर त्याला विचारा, इथं खोलीवर घेऊन या. त्यानंतर ओळख पटवून दिली तरच मला सहकार्य द्या. शाब्बास! मित्रांनो!! मित्र असावा तर असा. मित्रासाठी प्राण पणाला लावणारे मित्र जगात सापडणार नाहीत."

काही हरकत नाही असे म्हणून मी महादेवला त्यांच्या जवळ बसायला सांगितले व मी चटकन कॉलेजच्या हॉस्टेलमध्ये गेलो.

तिथे कासेगावचा विद्यार्थी बडेकर राहात होता. त्याला बाजूला बोलावून सर्व काही विचारले. त्यानं धन्वंतरी वैद्याची (कुलकर्णीची) संपूर्ण माहिती दिली. तरीही माझा विश्वास बसेना म्हणून मी बडेकरला खोलीवर घेऊन आलो. बडेकराने त्यांना ओळखले, त्यांचे पाय धरले. घरची खुशाली वैद्य महाशयानी बडेकरना सांगितली. कारण गावाबाहेरच्या त्यांच्या मळ्यात यांचा वरचेवर मुक्काम असे.

आता धन्वंतरी वैद्य यांची पूर्ण ओळख व खात्री पटल्यावर आम्ही त्यांना नमस्कार केला. बडेकरना जाण्यास सांगितले. तो निघून गेला. आम्ही हातानं केलेला स्वयंपाक शिल्लक होता. त्याना आम्ही जेवायला घातले. आता ते आमचे झाले होते. स्वातंत्र्यवीरांना सी. आय. डी. समजणं चुकीचं होईल म्हणून मी त्याना म्हणालो नागनाथ अण्णां सुरक्षित आहेत. "मला त्यांच्याकडे पोचवाल का?" अशी त्यानी इच्छा व्यक्त केली. मी म्हणालो, "उद्या अण्णा तिथून आपल्या कॅम्पमध्ये जाणार आहेत. तेव्हा चार-पाचच्या सुमारास इथून जाऊ या. तोपर्यंत आपण खोलीवर आराम करावा.

चार वाजण्याच्या सुमारास आम्ही सातारा शहरात थोडा फेरफटका केला. अद्याप गावच्या भोवतालचा पोलिस पहारा उठवला गेला नव्हता. त्यामध्ये थोडी शिथिलता आलेली होती. आता मोटारमध्ये बसलेल्या प्रवाशांना तपासून सोडलं जात नव्हतं. याचा फायदा आम्ही घेण्याचे ठरवून सहा वाजता मोटारीत बसलो. काळोशी गावच्या फाट्याजवळ उतरून नदीपर्यंत पोहोचलो. शेवटचं व्हडगं छोटी नाव पलिकडे जाण्याच्या आत आम्ही हजर झाल्याने आम्हांला यावेळी व्हडगं बसायला मिळाली. त्यांनाही बोगर गुरुजींच्या खोलीवर नेण्याचा प्रसंग आला. त्याना आम्ही हे वैद्य बुवा आहेत, तुम्हाला पोटातील विकार असल्याने यांचे पेटंट औषध द्यायला आणलं आहे; असे खोटेच सांगितले आणि खरोखरच वैद्य महाराजानी त्यांचे पोट तपासून त्याना चार-आठ गोळ्या दिल्या त्यामुळे नंतर बोगर गुरुजींच्या पोटातील वातविकार कमी झाला. हे जातिवंत

पिढीजात देशी औषधे देणारे वैद्य महाराज होते. देशाच्या स्वातंत्र्या-साठी तेही वणवण फिरत होते. स्वतः भूमिगत राहून, भूमिगत स्वातंत्र्य-वीरांना औषधपाणी देण्याचे अत्यंत महत्त्वपूर्ण काम करीत होते. धन्य आहे या वीराची ! धन्वंतरीनी रात्रभर काळोशीला आराम केला.

रात्रभर कर्मवीरांच्या कार्याचा, शाळेच्या बद्दल चर्चा करीत गप्पा मारून वेळ काढला. डोंगर, दरी-खोरी व मागासलेल्या भागात कर्मवीरांनी जे शिक्षणाचं खरखुरं देशकार्य चालवलं आहे. त्याला जगात तोड नाही. हेच खरं देशकार्य आहे. स्वातंत्र्य मिळाले तरी त्याचा उपभोग घेणारी जनता सुशिक्षित व ज्ञानी असणं फार महत्त्वाचं आहे. ज्ञानदान सर्वश्रेष्ठ आहे. नागनाथ अण्णा एकीवच्या डोंगरावरून कास तलाव ता. जावळी इथून आपला मुक्काम हलवणार होते. हे लक्षात आलं. मी सकाळी सात वाजता महादेव माटील व धन्वंतरींना इथंच ठेवून डोंगरावर एकीव गावी गेलो. वैद्य बुवांचा मला अद्याप भरवसा वाटत नव्हता. नागनाथ अण्णाना विचारल्याशिवाय हे मला खरं पटणार नाही अशी रुखरुख मनात होतीच. अण्णाना जाऊन भेटलो, अण्णाना ही सर्व हकीगत सांगि-तली. अण्णा हसत होते. नागनाथ अण्णा म्हणाले "ते धन्वंतरी कुठं आहेत ?" "बोगर गुरुजींच्या घरी काळोशी गावी आहेत." मी म्हणालो, "त्यांना आपल्याकडे घेऊन येऊ का ? का तो कोणी सी. आय. डी. अधिकारी वेष बदलून आला आहे ? जर असं काही असेल तर मला स्पष्ट सांगा. मी त्याना डोंगरावर अर्ध्या वाटेपर्यंत घेऊन येतो व इथल्या खोल दरीत ढकलून देतो ! म्हणून मी त्याना काळोशीलाच ठेवलं आहे. महादेव व बोगर पाटील त्यांच्याजवळ आहेतच." अण्णा म्हणाले, "अहो साहेबजी ! तसं काय करू नका, धन्वंतरी वैद्य आपल्या कॅम्पमधलेच एक क्रांतिवीर आहेत. तुम्हांला माहित आहे का ? आपल्या या सर्व संघट-नांचे, क्रांतीवीरांचे, स्वातंत्र्यसैनिकांचे सूत्रधार माननीय अच्युतराव पट-वर्धन आहेत. तेही बराचसा पैसा आम्हा स्वातंत्र्यसैनिकाना पुरवतात. त्यामुळे आपल्या कॅम्पचा दैनंदिन खर्चही चालण्यास मदत होते. कॅम्प-मधल्या कोणी वीरानं जर असा जेल वगैरे फोडला तर त्याला प्रथम जो

शोधून काढील त्याला अच्युतरावांकडून मानधन व वाहवा मिळत असे शिवाय धन्वंतरी वैद्य हे आपल्या कॅम्पमधील सैनिकांना मोफत औषध-पाणी देत असतात. ते फार धूर्त, चलाख, धोरणी व राजकारणपटू व मुत्सद्दी आहेत. आम्ही त्याना 'चीनची भिंत' म्हणत असतो. असं काही करू नका, त्यांना मजकडे घेऊन या. ते व मी दोघं आज इथून आमच्या कॅम्पमध्ये निघून जातो. त्यानी वेषांतर केल्यामुळे त्यांना कुणी ओळखू शकत नाहीत."

अशा प्रकारे मी नागनाथ अण्णांच्याकडून रात्री करून काळोशीला आलो आणि महादेव, बोगर यांच्यासह चौघेजण डोंगरावर भगवान गुरुजींच्या खोलीवर अण्णांच्याकडे घेऊन आलो. दोघांची राम-भरता-सारखी भेट पाहून आम्हा सर्वांना अत्यानंद झाला. लगेच वैद्य महारा-जानी आपल्या औषधपाण्याच्या पोतडीस हात घातला. अण्णांना कुठं काय लागलं वगैरे आहे काय याची विचारपूस केली. हाताला थोडं मलम लावलं. अण्णानी सांगितलं मी व धन्वंतरी आमच्या कॅम्पमध्ये जातो. तुम्ही सातारला जा, सावधगिरीने वागा, अभ्यास करून पास व्हा. आम्ही सुखरूप पोहोचल्याची सूचना येईल. पुन्हा मी वरचेवर बोलवून घेतोच. आता श्री. भ. कृ. पाटील गुरुजी, नागनाथ अण्णा, फासेगावकर वैद्य हे तिघे एकीवच्या (कासचा) डोंगरावरून निघून पाली मार्गे सज्जनगडच्या पायथ्याजवळून इंदोलीस क्रांतिकारक दिनकरराव कदम यांच्याकडे आले व पुढे दोघे आपल्या कॅम्पमध्ये पोहोचले.

तानाजींनी कोंढाणा किल्ला सर केल्यावर गडावर तोफा दणाणल्या होत्या परंतु अण्णा कॅम्पमध्ये पोहोचल्यावर तिसऱ्या दिवशी एक मुलगा आमच्या खोलीवर येऊन पाच रुपयाची नोट देऊन गुपचूप निघून गेला होता. यावरून आम्ही सर्व प्रकार ओळखून निर्धास्त राहिलो. आम्ही आमच्या अभ्यासात मन गुंतवले, परीक्षा पास झालो व नंतर नागनाथ अण्णांच्या कार्यात सहभागी झालो.

हिंदुस्थान स्वतंत्र होऊन आज पस्तीस वर्षे झाली तरी अण्णा आपल्या पूर्वीच्या सहकाऱ्यांना विसरले नाहीत आणि विसरणार नाहीत.

त्या काळापासूनची त्यांची संघटना अद्याप कायम व मजबूत आहे. त्यानी मला, महंमद शरीफ सनदे, माधव कवठेकर यांना आपल्या विद्यालयाच्या वार्षिक स्नेहसंमेलनप्रसंगी बोलावले होते. त्यावेळी महंमद, मी व माधव राव शाळेच्या बागेत गप्पा मारीत बसलो होतो. माधव कवठेकरानी मला नागनाथ अण्णांच्या जीवनाबद्दल माहिती विचारली. ती मी त्यांना थोड-क्यात विशद केली. अण्णांचे गाव वाळवं. रामचंद्र नायकवाडी हे त्यांच्या वडीलांचं नाव, त्यांच्या मातोश्रीचं नाव लक्ष्मीबाई. मातोश्रीचे वडील पोलिस खात्यात जमादार होते. त्यांचे मिरजवाडी हे गाव. शेतकरी कुटुंबात अण्णांचा जन्म झाला. अप्पासाहेब त्यांच्या बंधूंच नाव. आईकडीलचं घराणं शूरांचं होतं. त्यामुळे अण्णांच्या मध्ये शेतकरी घराण्यातील कष्ट, श्रम करण्याची व मातोश्रीच्या घराण्यातील वीरश्रीच्या गुणांचा संगम झाला होता. लक्ष्मीबाईनी मारुतीला नवस-सायास करून देशसेवेसाठी 'नागनाथ' मुलगा मागून घेतला होता. या मुलाला लहानपणापासून आईनं समाज-सेवा, देशसेवा, अन्यायाविरुद्ध बंड करणे याचं बाळकडू पाजलं होतं. त्यांच्या मातोश्रीचा खरा पिंड राजकारणी आहे. त्यामुळे राजकारणाचे धडे ती आपल्या मुलाला शिकवत होती. अण्णांचं पाचवीपर्यंतचं शिक्षण वाळव्यास झालं आणि सहावी-सातवीच्या शिक्षणासाठी त्यांना अष्टा शा. नं. १ च्या शाळेत घातले. मीही त्यांच्याच वर्गात शिकत होतो. घरची परिस्थिती सर्वसाधारण असल्याने त्यांना इथं फार त्रासानं शिकावं लागलं. सातवीच्या वर्गामध्ये गेल्यावर आम्हाला ह. ग. नवांगुळांसारखे देशप्रेमी, नावाजलेले शिराळचे शिक्षक लाभले होते. त्यावेळी सातवीच्या सेंटरच्या परीक्षेला फार महत्त्व होते. त्यामुळे आम्हाला अभ्यास करण्यास गुरुगृही रहावं लागलं होतं. त्यानी आम्हा दोघांच्या मनात देशाभिमान, स्वातंत्र्यप्रेम, समाजसेवा, गरीबाबद्दल प्रेम, शिक्षणाचे महत्त्व व इंग्रज सर-कारचा अन्याय या गोष्टी आमच्या हृदयात खोलपर्यंत रुजवल्या. आम्ही दोघेही सन १९४० साली सातवी पास झालो. मी व अण्णानी काही व्हॉलंटरी शाळा काढल्या. पुढे नागनाथ अण्णा इंग्रजी शिक्षणासाठी कोल्हापूरला गेले व मी सातारला गेलो. पुन्हा एकत्र आलो.

सन १९४२ साली म. गांधीनी चलेजावचा ठराव केला. स्वातंत्र्यासाठी लाखो तरुणांनी यात भाग घेतला. अण्णांनीही शिक्षण सोडून देऊन या आंदोलनात भाग घेतला. इंग्रज सरकारचे राज्य खिळखिळे करण्यासाठी सुभाषबाबूंप्रमाणे सशस्त्र आझाद हिंद सैनिकांचा कॅम्प सुरू केला. तारा तोडणे, पोष्ट जाळणे, रेल्वे पाडणे, पोलिस ठाण्यावर छापा घालणे, गुंडांचा नायनाट करणे, शेतसारा बंद करणे, स्वा. सैनिकांना मार्गदर्शन करणे, प्रतिसरकार स्थापन करणे, कचेरीवर झेंडा लावणे अशी अनेक कामे या काळात त्यानी केली. मीही त्याना वरचेवर सहाय्य करीत आलो. सरकारनं त्याना व त्यांच्या कुटुंबियांना खूप त्रास दिला, छळ केला, आई-वडील, भाऊ यांना तुरुंगात घातले. तरी हे कुटुंब डगमगलेनाही किंवा भीक मागायला गेले नाही. अण्णाना पकडण्यासाठी इंग्रज सरकारने पाच हजाराचे बक्षिस लावले होते. ते सतत चार-पाच वर्षे भूमिगत अवस्थेत देशाच्या स्वातंत्र्यासाठी शिर तळहातावर घेऊन डोंगर, दऱ्याखोऱ्या व जंगलात फिरत होते. त्याना पकडायला सरकार भीत होते.

१५ ऑगस्ट १९४७ ला देश स्वतंत्र झाला. इंग्रज लोक आपल्या देशातून निघून गेले. कॉंग्रेस सरकारच्या हाती सर्व सत्ता दिली. यावेळी अण्णा वाळवे तालुक्यामधून मुंबई असेंब्लीस उभे राहिले व प्रचंड मतांनी निवडून आले. त्यानी त्या ठिकाणचा कारभार पाहिला. म. गांधींच्या तत्त्वाप्रमाणे शेतकऱ्यांचं व गरीबांचं हे राज्य राहिलं नाही. सर्व सत्ता धनिकांच्या हाती आली. गरीब जास्तच गरीब होत चालला व श्रीमंत अधिक श्रीमंत होत आहेत. असले शासन त्याना पसंत पडले नाही व ते पुन्हा कधी निवडणुकीस उभे राहिले नाहीत. त्यानी आपला मार्ग बदलला. कर्मवीर भाऊराव पाटलांच्या शैक्षणिक कार्याशिवाय आता जनतेचा उद्धार होणार नाही हे ओळखून त्यानी कर्मवीरांच्या सहवासात बराच काळ घालवला. त्यांना एक लाख रुपयांची थैली अर्पण करण्यात त्यानी खूप परिश्रम घेतले व शैक्षणिक कार्यास वाहून घेतले. आज त्यानी सहकार क्षेत्रामध्ये क्रांती करायला सुरुवात केली.

सन १९५० साली ही. कि. अहीरांच्या नावाने वाळव्यास स्वतंत्र, फार

मोठे व अति उत्तम हायस्कूल सुरू केले आहे ते आता तुम्ही पहात आहातच. या विद्यालयात शिक्षणाच्या सर्व सोई आहेत. जवळच तुम्ही गुरूनानक वसतीगृह पाहिले आहे. या वसतीगृहात डांग जिल्हयातील अतिमागास जमातीचे विद्यार्थी रहातात. त्यांचे विनामूल्य वसतीगृह आज-तागायत चालू आहे. यांच्या विद्यालयामधील विद्यार्थी बौद्धिक व शारीरिक दृष्ट्या फार पुढच्या तयारीचे आहे. असंख्य विद्यार्थ्यांनी राष्ट्रीय पातळीवर सर्व खेळात प्रथम क्रमांक पटकावले आहेत. हे आता तुम्ही बक्षिसांच्या वेळी पाहिलेच.

माधवराव कवठेवर गुरुजी मध्येच म्हणाले, "अहो साहेबजी! नागनाथ अण्णानी शैक्षणिक, सामाजिक व राजकीय कार्यात फार मोठे कार्य केले हे स्पष्ट आहे. परंतु आज ते सहकार क्षेत्रात आणि विशेषतः सहकारी साखर कारखान्याच्या क्षेत्रात कसे वळले हे मला थोडंसं सांगितलं तर फार बरं होईल."

मी म्हणालो, "माधवराव, अण्णांना शेतकरी, कामगार, गोरगरीब, हरिजन–गिरीजन, या बहुजन समाजाच्या उद्धारासाठी रात्रंदिवस तळमळ व धडपड आहे. शेतकरी सुखी तर जग सुखी अशी म्हण आहे. त्यांचा जन्म शेतकरी कुटुंबातच झाला आहे. आज ते त्या शेतकऱ्यांची दुर्दशा प्रत्यक्ष पहात आहेत. जिकडं तिकडं धरणं, इरिगेशन झाली आहेत, होत आहेत. उसाच्या पिकाने हरितक्रांती केली आहे. महाराष्ट्रात अनेक साखर कारखाने सुरू झाले आहेत. गरीब शेतकऱ्यांना या कारखान्यांवर अवलंबून राहण्याची वेळ आली आहे. गरीब शेतकऱ्यांना कारखानदार द्वेषभावाने वागवतात. नेहमीच त्यांच्याकडे दुर्लक्ष करतात, इथेही गरीब श्रीमंत वाद निर्माण होऊ पहात आहे. मी गरीब शेतकरी, माझ्यावर एका कारखान्याने कारणाशिवाय केस करून मला त्रास दिला. हा त्रास मी नागनाथ अण्णांना सांगितला. "मी व अण्णा म. गा. विद्यालय, आष्टाच्या ग्राउंडच्या स्टेजवर रात्री नऊ वाजल्यापासून बारा-एक वाजेपर्यंत बसलो होतो. त्यावेळी नागनाथ अण्णाना मी सांगितले की, अण्णा, एक-दीड एकरवाल्या माझ्यासारख्या गरीब शेत-

कऱ्याचा ऊस कारखान्याने नेला तर नाहीच; परंतु असल्या दुष्काळात माझ्या-वर त्यांनी ऊस दुसरीकडे घालवला म्हणून केस भरून त्रास दिला आणि श्रीमंत शेतकऱ्यांनी दुसरीकडे ऊस घातला तरीही त्यांच्यावर केस भरली नाही. हा मजवर अन्याय केला आहे. तेव्हा जगात गरीबांचा कोणी वाली नाही. मात्र कारखान्यात ' अंधा बाँटे रेवडी और फिरी फिरी अपने को देय ' ही अवस्था आहे. लाखोनी रकमा पडून आहे. त्यांना डिव्हिडंड वगैरे वेळेवर देत नाहीत. मला हा अनागोंदी कारभार वाटतो. काही कारखाने उत्तम चालले आहेत, काही आजारी आहेत."
' कबीरदास म्हणतात, गरीबकी हाय ! निष्फल कब हूँ न जाय। मरे बैल के चामसे लोहा भस्म व्है जाय। ' ज्याप्रमाणे मेलेल्या बैलाच्या चाम-ड्याने लोखंडाचे सुद्धा भस्म होते, त्याप्रमाणे गरीबाच्या दुःखी सुस्काराने श्रीमंतांचा नाश होतो. अण्णा गरीबांचे वाली आहेत. त्याना माझा हा विचार पटला व नागनाथ अण्णानी वाळव्यास साखर कारखाना काढण्याचे वचन दिले आणि या कार्यास लागले. प्रथम त्यानी कारखान्यास लाग-णाऱ्या उसाच्या क्षेत्राचा सर्वे केला आणि आणखी किती एकर ऊस आपल्या गावी पाहिजे यासाठी त्यांनी पूर्तता करण्याकरिता सत्वर इरिगेशन करून इष्टांक पूर्ण केला. मग कारखाना काढण्याच्या कामाला लागले.

आष्ट्याचे माधवराव कवठेकर हे उत्तम चित्रकार शिक्षक असून ते मितभाषी आहेत; सज्जन, सुसंस्कृत व मनमिळाऊ स्वभावाचे आहेत. त्यानाही राजकारण व सार्वजनिक, सामाजिक कार्याची आवड आहे. गरीबांची दुःखे जाणून घेऊन ती दूर करण्यासाठी ते धडपड करीत असतात. ते जिज्ञासू वृत्तीचे, सरळ मार्गाचे, शुद्ध मनाचे व सरळ स्वभावाचे उत्तम शिक्षक आहेत.

त्यांनी मला विचारले की, " साहेबजी, अण्णानी या कारखान्याच्या शुभ आणि महान कार्यास कस-कसा प्रयत्न केला ते थोडक्यात मला याप्रसंगी सांगाल का ? " मी त्यांना म्हणालो, " का नाही सांगणार ? जरूर, जरूर सांगेन. हे पहा माधवराव नागनाथ अण्णांच्याकडे संघटना शक्ती फार मोठी आहे. तरुणांची संघटना करण्यात त्यांचा हातखंडा आहे. वाळव्याच्या

पंचक्रोशीत त्यानी हाक दिली की सर्व जनता त्यांच्या पाठीशी उभी असते. त्यांनी हुकूम सोडला की सर्वजण प्राण पणाला लावून कोणतेही कार्य करायला कटीबद्ध असतात. एक-दोन वर्षापूर्वीचंच एक उदाहरण सांगतो. यावरून त्यांच्या स्वभावाची, व्यक्तिमत्त्वाची कल्पना तुम्हाला येईल. मग मी तुम्ही विचारलेल्या प्रश्नाकडे वळतो.

"इस्लामपूर ते वाळवा या गावाला एक कच्चा रस्ता होता. रस्त्याने कुठलेही वाहन जाऊ-येऊ शकत नव्हते. खड्डे, खाच-खळगे होते एखाद्या पेशंटला गावामधून दवाखान्याकडे नेऊ लागले तर मोटारीचे धक्के, हादरे बसून वाटेतच त्याची इहलोकीची यात्रा संपायची. गावाने हा रस्ता पक्का किंवा डांबरी करण्यासाठी खूप प्रयत्न केला. अनेक वेळा अर्ज दिले. परंतु शासन आणि संबंधित खाते या कार्याकडे दुर्लक्ष करीत होते. बराच काळ गेल्यावर पक्का रस्ता करावा अशी मंजूरी देऊनही तो केला जात नसे. त्याचप्रमाणे नागठाण गावी नदीवर बंधारा बांधण्याची शासनाची इच्छा नाही, तेव्हा गावकरी आणि पंचक्रोशीमधील जनतेने नागनाथ अण्णांच्याकडे आपले म्हणणे मांडले. अण्णांनी संबंधित खाते व सरकारची ही दिरंगाई पाहून आश्चर्य व्यक्त केले. त्यांनी निर्णय दिला की "हा रस्ता डांबरी झाल्याशिवाय गावकऱ्यांनी शेतसारा द्यावयाचा नाही." शेतकऱ्यांचा शेतसारा सरकार घेत आहे परंतु त्याच्या क्षुल्लक अडी-अडचणी व गैरसोयी दूर करायला तयार नाही. तेव्हा त्याच्यावर हा उत्तम उपाय आहे." सर्व शेतकऱ्यांनी शेतसारा बंद केला. त्याबरोबर सर्व अधिकाऱ्यांचे डोळे खाडकन उघडले. तलाठी, सर्कल ऑफिसर, मामलेदार, प्रांतसो शेवटी कलेक्टरसो यांनी जंग-जंग पछाडले, परंतु शेतसारा वसूल करू शकले नाहीत. शेतकरी म्हणाले, "आधी गावचा रस्ता डांबरी करा व नागठाणचा बंधारा बांधा, मग शेतसारा" अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र सरकारला भराभर व भाराभर रिपोर्ट पाठविले. सरकारने एक वेळ एस. आर. पी. पाठवून गावाला दहशत दाखवून सारा वसूल करावयाचा प्रयत्न केला. परंतु एस. आर. पी. पोलिसांना गावात कोणी पाणीच प्यायला द्यायला तयार झाले नाही. त्यांनी ओळखलं 'इथं काही चालायचं नाही.' शेवटी ते

निघून गेले. सरकारनं दुसरा प्रयत्न करण्याची योजना आखली. गरीबांची भांडी-कुंडी जप्त करून तालुका ऑफिसात पोलिसांनी लॉरी भरून भांडी नेली. परंतु लोकांनी कचेरीवर मोर्चा नेऊन भांडी परत आणली. जनता सरकारला नमत नाही वसूलीचे सर्व मार्ग करून पाहिले आता काय करावे ? असा प्रश्न सरकार पुढे पडला. शेवटी सरकारनं गावाला मिलीटरी आणण्याचा विचार केला. परंतु मिलीटरीनं गाव अधिक भडकून जाईल. गोळीबार, अशांतता निर्माण होऊन कारणाशिवाय काही लोकांना प्राणास मुकावं लागेल आणि या मार्गानं शेतसाराही वसूल होणार नाही असा सरकारनं विचार केला आणि मिलीटरीची योजना रद्द केली. गावची मागणी योग्य आहे, रास्त आहे. रस्ता दुरुस्त करणं सरकारचं कर्तव्य आहे हे त्यांना कळून चुकलं आणि संबंधित खात्याला गावकऱ्यांची मागणी पुरी करावयास लावली. रस्त्याचे डांबरीकरण केले. तीन वर्षे संग्राम चालू होता. नागठाण गावी कृष्णा नदीवर बंधाराही शासनानं बांधून पूर्ण केला. मगच लोकांनी शेतसारा भरला. शेवटी शासनालाही या ठिकाणी नमतं घ्यावं लागलं ! याला म्हणायची संघटना शक्ती !

माधवराव म्हणाले, अहो ! **'गाव करील ते राव करणार नाही'** अशी एक म्हण आहे. त्याचा हा सामुदायिक प्रयोग अण्णांनी आपल्या गावी यशस्वी करून दाखवला म्हणायचा आणि सरकार बरोबर न्याय्य मार्गानं मुकाबला करण्याचे धैर्य कुठल्या वीर पुरुषाचे आहे का ? जिकडं सत्ता तिकडं जो तो टोप्या बदलून पळत आहे. अण्णा निस्वार्थी, त्यागी, सत्तेपासून आलिप्त, वशीला, लाचलूचपत, काळाबाजार याची मनापासून चीढ असलेली क्रांतिकारी महान व्यक्ती आहे यात शंका नाही. शेतसारा प्रकार मला सांगितला तो अति मोलाचा आहे. लोकसत्ताक राज्यामध्ये सरकारला जनतेच्या रास्त मागणीकडे अवश्य लक्ष देणे भाग आहे. हे त्याना कळून चुकलं. आता त्यांनी उभ्या केलेल्या कारखान्याची पूर्वपिठीका मला थोडीशी सांगा !

"दहा-बारा कोटी बजेटचा हा महान कारखाना उभा करण्यासाठी

जनता, सरकार, कार्यकर्ते, जागा व पैसा या सर्व गोष्टी जमल्याशिवाय त्याची उभारणी होऊ शकत नाही हे तुम्हाला माहीत आहेच. अण्णांनी हे महान कार्य हाती घेण्याचे ठरवून कामास लागले. त्यांच्या कारखान्याचे वैशिष्ट्य हे आहे की, त्यांचे ह. कि. अहीर विद्यालयाचे संघ शक्तिवरच हा कारखाना मिळवला असे म्हटल्यास वावगे होणार नाही." "ते कसं? हे मला काही कळत नाही." असे माधवराव मध्येच म्हणाले. "अहो! नागनाथ अण्णानी प्रथम हे कार्य शिक्षक व विद्यार्थ्यांवर सोपवलं. अशक्य गोष्ट शक्य करून दाखवायचं अण्णानी ठरवलं. शिक्षकांनी पंचक्रोशी-मध्ये तीन-तीन महिने विद्यार्थ्यांच्या फेऱ्या काढल्या व कारखान्या-बद्दल लोकजागृती व प्रचार केला. नंतर या परिसरामधील पंधरा गावे निश्चित केली. प्रत्येक शिक्षकाला शेअर्स जमवण्यासाठी गावे वाटून दिली. त्यांनी हे सभासद जमवण्याचं काम ब रचसं केलं. जनतेची साथ मिळू लागली. चार पाच महिन्यात पुष्कळ कार्य करून दाखवलं. कारखान्यास जवळ जवळ कमीत कमी शंभर ते दीडशे एकराची जागा असावी लागते. वाळव्यास गंजी खान्याची सार्वजनिक अशी पंधरा ते वीस एकरची पडीक जागा आहे. बाकी आसपास शेतकऱ्यांच्या पिकावू जमिनी असल्याने जवळजवळ शंभर एकर जमीन कशी मिळवावयची ही अती अवघड समस्या होती. सर्व कार्यकर्ते या बिकट अडचणीत पडले होते. अण्णा म्हणाले हा प्रश्न कसा सोडवायचा ते नंतर पाहू, कारण अण्णा ही अत्यंत कल्पक व्यक्ती आहे. जेवढी अडचण येईल तेवढं त्यांचं कार्य सोपं, उज्वल व सहज होत असतं. प्रथम या गंजीखान्याच्या जागेवर कारखान्याची योजना आखून बजेट तयार केले. भारत सरकार व मुंबई सरकारला कारखान्याच्या मागणीचा अर्ज सादर केला. कारखान्यास हु. किसन अहीरचे नाव दिले. किसन अहीरच्या पुण्याईने जनतेच्या, शेतकऱ्यांच्या सहकार्याने हा कारखाना मिळवायचा निश्चय केला आणि मुंबईला कार-खान्याच्या मंजूरीची शिफारस घेऊन भारत सरकारचे मंजूरी व परमिट (लायसेन्स) मिळवण्यासाठी दिल्लीस दोन-तीन महिने ठाण मांडून बसले. इकडून पंधरा गावामधील लोकांनी कारखान्यासाठी हजारो सह्यांचा अर्ज

सरकारकडे पाठविला.

काही असंतोषी लोकांनी हा कारखाना होऊ नये म्हणून खूप प्रयत्न केले. निरनिराळ्या अफवा उठवल्या की कारखान्यास जागाच नाही मिळाली तर खांडसरीला परवानगी मिळेल. लोक शेअर्स भरणार नाहीत, ज्यांनी शेअर्सची रक्कम भरली ती आता गेली, परत मिळणार नाही. अशा कंड्या पिकवल्या जात होत्या. परंतु याला कार्यकर्त्यांनी दाद दिली नाही. त्यांनी सतत आपले कार्य चालूच ठेवले. त्यांना पूर्ण विश्वास होता की, अण्णा कारखान्याची परवानगी मिळावल्याशिवाय राहणार नाहीत. अण्णानी दिल्लीस सहजासहजी ही परवानगी मिळवून भारत सरकारचे कृषीमंत्री यांची सही त्यावर घेतली. अण्णाना कृषी मंत्री माननीय वीरेंद्र सिंग म्हणाले, "तुमच्या कारखान्याची मंजूरी, परमिट आम्ही तुमच्या वाळव्याच्या पत्त्यावर आठ दिवसात पाठवतो. तुम्ही निर्धास्त जा." अण्णा वाळव्यास परत आले व ठरल्याप्रमाणे दिल्लीहून कारखान्याच्या परवानगीबद्दलचे परमिट (लायसेन्स) आले. सर्व वर्तमानपत्रांमधून त्याची बातमी प्रसिद्ध झाली. हा प्रचंड साखर कारखाना अण्णानी मिळवल्याने सर्व जनतेने त्यांना धन्यवाद दिले. यामुळे विरोधकांचे आइस्क्रिम झाले. सर्व लोक म्हणू लागले की, "कुठल्याही सत्तेवर, अधिकारावर अण्णा नसताना त्यांनी हा कारखाना मिळवला तेव्हा त्यांची चिकाटी, कार्य, धाडस, व्यक्तिमत्व, संघटनाशक्ती, कार्याची जिद्द अगाध व अफाट आहे यात शंका नाही." लोकांचा त्यांच्या या कार्यावर मोठा विश्वास बसला व हा हा म्हणता शेअर्स सभासद इष्टांक पूर्ण झाला. "हुतात्मा किसन अहीर यांच्या पुण्याईनेच हा कारखाना आपणास मिळाला" असे अण्णा म्हणाले व पुढच्या कामास त्यानी सुरुवात केली.

अण्णा प्रत्येक रविवारी शेअर्स सभासदांच्या मीटिंगा घेऊन प्रत्येक बाबीची चर्चा करून कारखाना उभारण्याची वाटचाल करू लागले. आता जागेची समस्या होती ती त्यांनी सहज सोडविली. ज्यांना जमीन हवी त्यांना दुसरीकडे जमीन घेऊन दिली. ज्यांना पैसे हवेत त्या शेतकऱ्यांना चालू दराने रोख पैसे देऊन जमीनी खरेदी केल्या.

सरकारी आदेश त्यांच्याकडे आला होता की, "कारखान्याचे जवळपासचे जे शेतकरी जमीन द्यायला तयार नसतील त्यांच्याकडून आम्ही सरकारी दराने घेऊन देऊ." परंतु अण्णांनी अशा शेतकऱ्यांवर अन्याय केला नाही. त्यांनी चालू दराने त्यांना पैसे दिले. प्रत्येकाच्या मनामध्ये या कारखान्याबद्दल आपलेपणा, आदर, प्रेम, सदिच्छा निर्माण झाली. तो सत्वर सुरू करण्याचा अहोरात्र अटोकाट प्रयत्न करू लागले. "दस की लकडी एक का बोझा" त्याप्रमाणे प्रत्येक जण यथा शक्ती या कारखान्याच्या कार्यात सक्रीय भाग घेऊ लागला. विद्यालयामध्ये झाडलोट करणाऱ्या मीराबाई या गरीब स्त्रीनं सुद्धा जिवाचं रान करून एक हजार रुपयांचा शेअर्स घेतला. हे या कारखान्याचं वैशिष्ट्य म्हणायला नको का?

कारखान्यामुळे परिसरामधील पंधरा गावांचा कायापालट होणार आहे. यामुळे सर्वत्र आनंदी आनंद पसरला होता, लोकांच्यामध्ये नव-चैतन्य, जागृती व उत्साह शिगेला जाऊन पोहचला होता. विरोधकांनाही आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या की, आपल्या भागात गावाला कारखाना झाला. तेही भेदभाव विसरून सक्रीय सहकार्य देऊ लागले. कारखान्यामध्ये तरूण, उत्साही, कर्तबगार, सुशिक्षीत बेकार, उत्तम कारागीर, मोठमोठे अधिकारी अशा हजारो लोकांना नोकरी कामधंदा मिळणार होता. शेतकऱ्यांना उत्तम प्रतीचा ऊस पिकवून अखंड कारखान्यात पुरवून आर्थिक सुबत्ता करण्याची कायमची संधी प्राप्त झाली आहे. त्यापुढे प्रत्येकाचे लक्ष या किसन अहीर कारखान्याकडे वेधले होते यात शंका नाही.

कारखान्याने आपला आर्थिक हिस्सा पूर्ण केल्यावर बाकीची आर्थिक जबाबदारी सरकारने सत्वर पूरी केली. र. शि. संस्थेचे माझे आष्टा गावचे आणि घराशेजारचे माझे वर्गमित्र व लंगोटी दोस्त मॅनेजर श्री० मा. तु. शिंगटे आणि सातारच्या संस्थेचे ऑडिटर श्री. गोखले यांनी बजेट, अकौन्ट, जमाखर्च आदी कामात वेळोवेळी सहकार्य दिले.

माधवराव म्हणाले, "कारखान्याच्या बऱ्याच इमारती बांधून झाल्या आहेत. सव्वा सव्वा लाख साखरेची पोती मावतील एवढी दगडी भव्य चार गोडावून आणि मुख्य मशिनरी, भव्य इमारत, बॉयलरचे मजबूत व उत्तम बांधकाम, ऑफिस, ऑफिसरांचे बंगले इत्यादि कार्य पहाण्या-जोगे आहे. परंतु अण्णांनी नोकरांचा प्रश्न कसा सोडवला हे मला कळालं नाही."

"प्रत्येक गावच्या शेअर्स संख्येच्या प्रमाणात त्या त्या गावच्या शेतकऱ्यांनी एकमुखाने, एकमताने कारखान्यास योग्य तरुणांची निवड करून पाठवली. तो अनट्रेन्ड असला तर त्याला कारखान्याच्या कामाचे ट्रेनिंग देण्यास कारखान्यामार्फत पाठवून तयार केला. त्यामुळे हा आपला-तुपला, वशील्याने घेतला असा प्रश्नच निर्माण होऊ शकला नाही. शिवाय प्रत्येक गावची संघटनाही मजबूत झाली असे म्हणावयास हरकत नाही. या पंधरा गावामधील सर्व सुशिक्षित ग्रॅज्युएट पाचशे तरुणाना बोलावून त्यांची एक जनरल टेस्ट (परीक्षा) घेऊन त्यामधील काही लायक तरुणांना ट्रेनिंग देऊन कारखान्यात नोकरीवर घेतले आहे. शिवाय तेहतीस टक्के मागासवर्गीय तरुणांनाही या नोकरीची संधी दिली आहे. सध्या दुष्काळ असल्याने अनेक मजूरांनाही काम मिळाले आहे. आज हा कारखाना आपल्या वैशिष्ट्यपूर्ण अवस्थेत मोठ्या दिमाखाने "हुतात्मा साखर" निर्माण करून सर्वांचे तोंड गोड करीत आहे. या कारखान्याचे श्री. शामराव सव्वाशे हे वाळवा गावचे सातवीपर्यंत शिक्षण झालेले, साधे शेतकरी अण्णांच्या सहवासात सतत चाळीस–पन्नास वर्षे काम करीत असलेले चेअरमन आहेत व सर्व डायरेक्टर साधे शेतकरी आहेत."

माधवराव म्हणाले, "साखरेव्यतिरिक्त या कारखान्याच्या कार्याच्या काही अन्य योजना आहेत का?" माधवराव, "तुम्ही चांगला प्रश्न विचारला हं! अहो दुध-डेअरी, कुक्कटपालन, लिकर, कागद व्यवसाय, कॅटल फिल्ड अशा पुष्कळ योजना आहेत. यासाठी इस्लामपूर रस्त्याकडेला पडवळवाडी शेजारी सरकारची मीठ फुटलेली शंभर दिडशे एकर जमीन कारखान्याने घेतली आहे. त्यामध्ये हे निरनिराळे व्यवसाय सुरू केले जाणार आहेत.

यामुळे कारखान्याच्या कामास अधिक गती, स्थिरता, भक्कमपणा प्राप्त होणार आहे."

"अण्णांचे शैक्षणिक कार्याकडून दुर्लक्ष होईल असे तुम्हाला वाटत नाही का?" माधवराव म्हणाले. "माधवराव, ही शंका तुम्हाला येणं साहजिक आहे. परंतु मी अण्णांना कारखाना काढतेवेळी सांगितले की, सध्याच्या तुमच्या हायस्कूलचे रूपांतर कॉलेजमध्ये केले पाहिजे आणि ते त्यांनी मान्यही केले आहे. सध्या पाचवी ते बारावी पर्यंतचे हायस्कूल आहे. स्वतंत्र जिजामाता कन्याशाळा ही जवळच आहे. पुढे विद्यार्थ्यांच्या महाविद्यालयीन शिक्षणाची सोय अवश्य केली जाणार आहे व या कॉलेजला त्यांचे जिवलग परममित्र कै. क्रांतिसिंह नाना पाटील हे नाव दिले जाणार आहे. थोडा आपण धीर धरू या. हे काम हळूहळू पूर्ण होणार यात शंका नाही. शिक्षणाच्या सर्व सोयी या ठिकाणी उपलब्ध झाल्याशिवाय राहणार नाहीत. नागनाथ अण्णांचं शिक्षण जरी मॅट्रीकपर्यन्त झालं असलं तरी शिक्षणकार्याला कधी विसरणार नाहीत. कारण विद्यार्थी व शिक्षक यांचा हा कारखाना निर्माण करण्यात सिंहाचा वाटा आहे, मग ते आपल्या मूळच्या या शिक्षण कार्याला कसे विसरतील! उलट या कामात ते अधिक वाढच करतील अशी माझी खात्री आहे. ते एक वेळा दिलेलं वचन व हाती घेतलेलं काम पूर्ण केल्याशिवाय कधीच राहत नाहीत. हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. 'बोले तैसा चाले तयाची वंदावी पाऊले' या उक्तीप्रमाणं ते बोलतात त्याप्रमाणे कृती करून दाखवतात. असे हे क्रांतिवीर कर्मवीर आणि सहकार महर्षी शोभतात यात वाद नाही.

नागनाथ अण्णांचा जन्म १५ ऑगस्ट १९२२ आहे. आज त्यांच्या वयाला एकसष्ट वर्षे पूर्ण होत आहेत. परंतु त्यांचे शरीर धष्ट-पुष्ट, कठीण आणि कणखर आहे. ऐन पंचविशीच्या तरुणाला लाजवील असा त्यांचा उत्साह, धमक व साहस आहे. एकसष्ट वयाच्या कालावधीत एवढी मोठी जबाबदारी ते सहजासहजी पार पाडू शकतात. यावरून त्यांच्या ऐन पंचविशीच्या जवानीची सुरुवात झाली असं म्हणावं लागेल. आजच्या

तरुणांच्यामध्ये ही कार्यक्षमता आहे काय ? त्यांना भेटण्यासाठी कोणीही किंवा कितीही माणसे आली तरी त्यांचे ते आदरातिथ्य केल्याशिवाय राहत नाहीत. गेल्या गेल्या चहापाणी, लिंबूसरबत आणि भाजी भाकरीचं जेवण केल्याशिवाय त्यांना ते जाऊ देत नाहीत. भुकेल्याची भूक जाणणं व तहानलेल्याची तहान जाणनं हा फार मोठा गुण त्यांच्या अंगी आहे. मग तो लहान असो किंवा मोठा असो त्याचं ते आदरातिथ्य करणारच. यावरून त्यांच्यामध्ये असलेल्या माणुसकीची, व मानवतावादाची कल्पना आल्याशिवाय राहात नाही.

नागनाथ अण्णांचे कुटुंब फार मोठे आहे. यांच्या वडिलाना एक वर्षाचा तुरुंगवास भोगावा लागला. वडील घरचा सर्व कारभार पाहतात. वडील रामचंद्र फार कष्टाळू शेतकरी आहेत. ते रात्रंदिवस शेतामध्ये राहूनच भूमातेची सेवा करीत असतात. खरोखरच शांत व वीर कार्याला चालना देतात. मातोश्री लक्ष्मीबाई ह्या शरीराने धष्ट-पुष्ट व कणखर आहेत. त्यांना राजकारणाचं लहानपणापासून वेड आहे. म्हणून त्यांनी नागनाथ सुपुत्राला स्वातंत्र्याच्या संग्रमात मार्गदर्शन केले. त्या शाळेचा घरचा व कारखान्याचाही कारभार पहातात. सतत मार्गदर्शन करीत असतात. लक्ष्मीबाई ह्या खऱ्या शूरवीर महिला आहेत. त्या फार धाडसी, राजकारणपटू, हजरजबाबी आहेत. स्त्रियानी शिकलं पाहिजे, पुढं आलं पाहिजे, नोकरी केली पाहिजे, व संसारही चांगला केला पाहिजे असं सर्वांना सांगतात. कुठल्याही शुभ कार्याला आशिर्वाद मागण्यासाठी मोठमोठे पुढारी आईच्याकडे धाव घेत असतात. नागनाथ अण्णाही आईचा रोज आशिर्वाद घेतल्याशिवाय आपल्या दैनंदिन कार्याला सुरुवात करत नाहीत. त्यांचा आशिर्वाद व्यर्थ जात नाही. सत्य, स्पष्टवक्तेपणा हे त्यांचे गुण नागनाथ अण्णांच्या हृदयात कायम वास करीत आहेत. लक्ष्मीबाईच्या वयाला आज ऐंशी वर्षे होत आली. परंतु त्यांची शरीरयष्टी चांगली आहे. मराठमोळ्या स्त्रियांप्रमाणेच त्यांची साधी भाधी चोळी, लुगडं हा पोषाख आहे. तरीसुद्धा त्यांना मुंबई राज्याचे मुख्यमंत्री, भारताच्या पंतप्रधान श्रीमती इंदिराजी गांधी, खासदार मान.

यशवंतरावजी चव्हाण यांच्या स्टेजवर मानाची खुर्ची दिली जाते. यावरून त्यांचे व्यक्तिमत्व किती श्रेष्ठ दर्जाचे आहे हे आपणाला दिसून येईल. वेळ प्रसंगी त्या स्टेजवर आपल्या खेडवळ भाषेत लाखोंच्या जन-समुदायापुढे व्याख्यानही देऊ शकतात. धीटपणा व व्याख्यानकला हे गुण अशिक्षित लक्ष्मीआईना जन्मजात असले पाहिजेत हे दिसून येईल. कुठलीही स्त्री किंवा पुरुष असो मजूर असो किंवा मंत्री असो त्याला ते बोलायला लावतात. त्यांच्याशी बोलताना निर्मळ व स्वच्छ मनानं बोलावं लागतं. ओठावर एक व पोटात एक असं बोलणं ते चटकन ओळखून आपल्या बोलण्याने अडचणीत पाडतात. माणसांची पारख करण्याची शक्ती त्यांच्यामध्ये आहे. त्यांची स्मरणशक्तीही फार जबरदस्त आहे. पंचवीस तीस वर्षापूर्वीची एखादी गोष्ट त्याना आपण सांगितली असली तरी त्या भेटल्यावर विचारतील की "अमुक वर्षापूर्वी तुम्ही अमुक गोष्ट बोलला होता त्याचं काय झालं ? ते काम झालं का ? नसल्यास मी स्वतः येते व ते काम करून देते" असे सांगतात. कुणाचंही आणि कसलंही अवघड काम असो, लक्ष्मीआई त्या केल्याशिवाय रहात नाहीत. या सर्व गुणांची नागनाथ अण्णांना वडिलार्जित देणगी मिळाली आहे. हे अण्णांचं सद्भाग्य आहे. लक्ष्मीआई ह्या विद्यालयाच्या प्रत्येक कामामध्ये जातीने लक्ष घालतात. गुरू नानक वसतीगृहासाठी गावोगाव व घरोघर फिरून धान्य, मदत जमा करून मुलांच्या जेवणखाण्याची व्यवस्था पहातात. बोर्डिंगच्या मुलाना चांगलं जेवण करून घालतात का नाही यावरही त्यांचे लक्ष असते.

या विद्यालयामधील मुला-मुलींना खेळाची फार आवड आहे. शाळेच्या वेळे व्यतिरिक्त ग्राऊंडवर मुला-मुलींना खो-खो, कबड्डी, लांब उडी, उंच उडी, गोळाफेक, पळणे, फुटबॉल, व्हॉलीबॉल, कुस्ती इत्यादी खेळांचे मार्गदर्शन शिक्षक-शिक्षिका देत असतात. मुला-मुलींच्या सांघिक व वैयक्तिक खेळामध्ये त्यांना तालुका, जिल्हा, राज्यपातळीवर सतत पाठवले जाते. या मुला-मुलींच्या बरोबर स्वतः लक्ष्मीआई, मुलं-मुली ( खेळाडू ) घेऊन बुलढाणा, अमरावती,

पुणे, मुंबई, यवतमाळ इत्यादी लांब–लांबच्या ठिकाणी जाऊन मुला-मुलींचे प्रथम–द्वितीय क्रमांक मिळवून गावचा व शाळेचा नाव-लौकिक वाढवतात. लक्ष्मीआई स्वत: त्या ठिकाणी मुला–मुलींचे खेळ पाहण्यास हजर राहतात, जर पार्शिलीटी किंवा अन्याय होत असेल तर त्या अंपायर किंवा अधिकारी यांना स्पष्ट बोलायला कधी भीत नाहीत. उत्तम खेळाडूंना दूध, खाणंपिणं याची त्या हयगय करीत नाहीत. अशा प्रकारच्या विद्यालयाच्या अनेक जबाबदाऱ्या त्या पार पाडतात. आईना खेळाचीही किती आवड आहे हे स्पष्ट दिसून येते. मुला–मुलींच्या खेळासाठी या विद्यालयात सर्व सोई व साहित्य उपलब्ध करून दिले आहे. स्वतंत्र जिमखाना असून कुस्तीचे मार्गदर्शन करण्यास स्वतंत्र वस्ताद ठेवले आहेत. अण्णा कुठं परगावी गेले तर लक्ष्मीआई या सर्व गोष्टीवर रात्रं–दिवस लक्ष ठेवतात.

"नागनाथ अण्णांच्या मातोश्री लक्ष्मीआई ह्या आष्ट्यास वरचेवर तुमच्या घरी येतात त्यावेळी त्यांचा व माझा बराच परिचय झाला आहे. सर्वजण त्याना "आई" म्हणून ओळखतात. परंतु अण्णांच्या धर्मपत्नी-बद्दल मला काहीच माहिती नाही. वास्तविक अण्णा एवढी महान व्यक्ती आहे तेव्हा त्यांच्या पत्नीही महान असणारच असे मला वाटते. तेव्हा त्यांच्याबद्दल थोडं सांगाल का?" असे माधवराव मला म्हणाले.

नागनाथ अण्णा मधून–मधून आमच्याकडे येऊन जात होते. आमची विचारपूस करून जात आणि निवांत गप्पा–गोष्टी करीत बसलेलो पाहून ते आपल्या कामाला लागत असत. रात्र झाली की अण्णाना उजाडतं. ते आपली कामं रात्रीच्या वेळी खूप प्रमाणात करीत असतात. रात्र–रात्रभर जागून काम करण्याची त्यांना भूमिगत अवस्थेपासून सवय लागून राहिली आहे. अधून मधून ते आम्हाला मुलांकरवी लिंबूसरबत पाठवून देत.

"माधवराव तुम्ही आता मुख्य मुद्याकडे वळला अहात तेव्हा त्यांच्या पत्नी व मुलांबद्दलची माहिती सांगणे आवश्यक आहे. नागनाथ अण्णांच्या पत्नीचं नाव कुसुम, त्यांचं माहेर किर्लोस्करवाडी. अण्णांचं

लग्न वयाच्या २५ व्या वर्षी झालं. त्याना सध्या तीन मुलगे व दोन मुली आहेत. जेष्ठ मुलगा किरण हा शेतीचा व्यवसाय करतो आणि आपले आजोबा, चुलते यांना मदत करीत असतो. दुसरा मुलगा अरुण हा बी. एससी. ॲग्रीकल्चर आहे. तिसरा वैभव हा शिकत आहे. एक मुलगी सौ. विशाखा डबल ग्रॅज्युएट व दुसरी प्रगती ऊर्फ शोभा ही बी. ए. आहे. दोन्ही मुलींची लग्न होऊन त्या सासरी गेल्या आहेत. क्रांतिवीराची पत्नी क्रांतिवीरांगना असणं साहजिक आहे. परंतु त्या सुविद्य, सुसंस्कृत व सुशिक्षित आहेत. त्या बी. ए. बी. एड्. असून ह. कि. अहिर विद्यालयाची जिजामाता स्वतंत्र कन्या प्रशालेच्या त्या मुख्याध्यापिका आहेत. याची त्यांनी दिवसे-दिवस खूप प्रगती केली आहे. याचे रिझल्टही त्यांनी उत्तम प्रकारे लावले आहेत. त्या एक आदर्श शिक्षिका आहेत. त्याचप्रमाणे त्या आदर्श गृहिणीही आहेत. घरची स्वतःची सर्व कामे स्वतः केल्याशिवाय रहात नाहीत. घरातील झाडलोट करण्यापासून स्वयंपाकापर्यंतची सर्व कामे करण्यामध्ये त्या सतत गुंतलेल्या असतात. त्या आपला एकही क्षण कधीच वाया घालवत नाहीत. त्यांची शरीरप्रकृती किरकोळ व सडपातळ आहे. परंतु काम करण्याची क्षमता फार मोठी आहे. आपल्या मुला-मुलींच्या शिक्षण वगैरेवर चांगले लक्ष ठेऊन त्यांना उत्तम मार्गदर्शन केले आहे. अण्णा भूमिगत असताना त्यांनी पुष्कळ हालअपेष्टा, कष्ट, त्रास सहन केला आहे. त्या मनमिळाऊ असून सेवाधर्म हा त्यांचा सर्वश्रेष्ठ गुण वाखाणण्यासारखा आहे. त्या अण्णांच्या शिक्षण, सहकार व देशकार्यामध्ये त्यांच्या पावलावर पाऊल ठेऊन चालल्या आहेत. त्यांच्या गृहदक्ष कार्यामुळे अण्णांना असली मोठ-मोठी कामे करण्यास उत्साह व स्थिरता लाभते आहे यात शंका नाही. घरची प्रापंचिक कटकट, त्रास, देवघेव, अडीअडचणी नागनाथ अण्णांना भासू दिल्या नाहीत.

"अण्णांनी पूर्वीच्या आश्रम पद्धतीप्रमाणे गृहस्थाश्रम सोडून वानप्रस्थाश्रम स्वीकारलेला आहे असे म्हणावे लागेल. आज पंचवीस वर्षे झाली. ते घर विद्यालयाच्या जवळ, जवळ-जवळ दोनशे पावलांवर आहे. परंतु

नागनाथ अण्णा या शाळेसमोरच्या अतिसुंदर, भव्य अशा बागेच्या लगत असलेल्या एका हॉलमध्ये रात्रंदिवस आपले वास्तव्य करीत असलेले दिसून येईल. जेवणखाणं, झोपणे वगैरे या विद्यालयाच्या ऑफिसमध्येच. कारण संसार सुखात राहून शैक्षणिक, सहकार, देशसेवा इत्यादी सार्वजनिक हिताची कार्ये करता येत नाहीत असे त्यांचे मत आहे. यासाठी संसार-सुखाचा त्याग करून त्या कार्याला तन, मन, धनाने वाहून घेतलं तरच ते कार्य आदर्श करता येते. महात्मा गौतमबुद्धाने संसार-सुखाचा त्याग करून गरीबांना सुखाचा मार्ग दाखविला हे आपल्याला माहित आहेच. तद्वत अण्णांनी वानप्रस्थाश्रम स्वीकारून हा साखर कारखाना काढून गोरगरीब, मजूर, शेतकरी यांना सुखाचा मार्ग दाखवून दिला आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही असे मला वाटते. असे विविध प्रकारचे कारखाने अण्णानी काढून गरीब जनतेचा दुवा घ्यावा. ‘बहुजन हिताय बहुजन सुखाय’ असले काम करण्यासाठी परमेश्वराने त्यांना उदंड आयुष्य द्यावे हीच सदिच्छा आहे.”

“साहेबजी, मीही तुमच्या या कथन करण्याच्या ओघात वाहून गेलो याची मला कल्पना सुद्धा आली नाही. अण्णांचे ध्येय, तत्त्व पूर्वीची आश्रम पद्धती याचा उलगडा तुम्ही सहजासहजी केला. यामुळे मला खूप आनंद झाला. साहेबजी, अण्णांच्या सर्व कुटुंबाची माहिती इथं चांगल्या प्रकारे करून दिली; परंतु त्यांचे बंधुराज यांच्याबद्दल काहीच दिसून आले नाही.”

“‘अप्पा’ हे अण्णांचे कनिष्ठ बंधू आहेत. त्यांचा तो पांढरा फेटा, साधा शर्ट, गुडघ्यापर्यंत धोतर, गोल चेहरा, सावळा रंग, शांत चेहरा पाहून कुणालाही त्यांच्याबद्दल मनात आदर, आपलेपणा व आपुलकी वाटल्याशिवाय राहणार नाही. ते फारसे शिकलेले नाहीत. घरचा सर्व कारभार ते पाहतात व उत्तम शेतीही करतात. शिवाय अण्णांच्या प्रत्येक कार्यात सहभागी होतात. अण्णांच्यावर आलेल्या कुठल्याही संकटाला तोंड द्यायला ते तयार असतात. अप्पानाही तुरुंगवास भोगावा लागला. अण्णांना ते कधी विसरत नाहीत व अण्णाही त्याना विसरत

नाहीत. गावामधील सर्व लोक त्यांना चांगले मानतात. सार्वजनिक कार्या मध्ये त्यांनीही कधी संसारसुखाची परवा केली नाही. लोकांच्या अडी-अडचणी दूर करावयास ते नेहमी पुढे असतात. लोकांचा त्यांच्यावर मोठा विश्वास आहे. ते बोलतात त्याप्रमाणे कृती करून दाखवितात. अप्पांचे शेतकरी लोकांशी फार घनिष्ट संबंध असल्याने त्यांच्यामध्ये ते नेहमी मिळून-मिसळून राहतात. सुख-दुःखे ऐकून ती दूर करण्याचा प्रयत्न करतात. त्यांना वेळोवेळी शेतीकामाचे मार्गदर्शन करतात. ते स्वतः फारसे जरी शिकले नसले तरी त्यांना शिक्षणाची आवड फार आहे. ते गावामधील गोर-गरीबांच्या मुलांना शिकण्यासाठी अनेक मार्गाने सहाय्य करतात. सरळ व स्वच्छ अंतःकरणाचे अप्पा नेहमी आपल्या कामामध्ये दंग असलेले दिसतील. वेळात वेळ काढून वसतीगृह, शाळेची शेती, गुरंढोरं, शाळा याकडे रोज एक-दोन वेळा फेरफटका मारून त्यांना सूचना देऊन मगच घरी परततील. अण्णांच्या प्रमाणेच त्यांचाही गावात दबदबा आहे. क्रांतिसिंह नाना पाटलांच्या प्रमाणे ते साध्यासुध्या खेडवळ भाषेत, राजकारण, शिक्षण, शेती, सहकार इत्यादी विषयावर इतरांशी चर्चा करतात व आपल्या अडाणी शेत-कऱ्यांनाही याचे ज्ञान देत असतात. त्यामुळे गावचे असंख्य शेतकरी मोठ्या संख्येने अण्णांच्या प्रत्येक कामात हिरीरीनं भाग घेऊन काम पूर्ण करून दाखवितात. शेतकऱ्यांच्यामध्ये जागृती करण्याचे काम अप्पा फार चांगले करीत असलेले दिसून येईल. अप्पा मितभाषी असून, मन-मिळावू व्यक्ती आहेत. त्यांचे आदरातिथ्य वाखाणण्याजोगे आहे. आज त्यांच्या वयाला सत्तावन्न वर्षे झाली तरी त्यांचे शरीर कणखर आहे. श्री. रामचंद्रांच्या 'अण्णा' व 'अप्पा' या जोडीने लोकहिताचे कार्य वाळव्यात अतिउत्तम प्रकारे चालविले आहे यात तिळमात्र शंका नाही.

साहेबजी, मगाशी तुम्ही क्रांतिसिंह नाना पाटलांच्या नावाचा उल्लेख केला, तेव्हा नाना पाटील व नागनाथ अण्णा यांचा काही पाहुणे-पैचा संबंध होता काय? वाळव्यात मी तुमच्या बरोबर वरचेवर आलो त्यावेळी नागनाथ अण्णांनी नाना पाटील यांची सर्व व्यवस्था गुरू नानक या

आपल्या वसतिगृहात केली होती. त्यांची देखरेख, औषधपाणी वगैरेंचा खर्च अण्णा करीत होते. आपण दोघे अनेक वेळा त्यांनी रशियामध्ये काही काळ राहून तिथली संस्कृती, शिक्षण, राजकारण, सुधारणा इत्यादी गोष्टींचे हसत हसत केलेले वर्णन त्यांच्याजवळ बसून तासंतास ऐकत होतो. त्यांचा अंत्यविधीसुद्धा वाळव्यातच करण्यात आला. मी सांगितले, "नाना पाटील अण्णांचे कोणी पाहुणे-पै नाहीत. हे दोघे ४२ सालचे प्रतिसरकार क्रांतिवीर व जिवलग मित्र आहेत."

"माधवराव, तुम्हाला तशी शंका येणं साहजिक आहे. तुम्ही आता हे विचारलं म्हणून सांगणं भागच आहे. याचा इतिहास बराचसा खोल आहे. तरी तो मी तुम्हाला इथं थोडक्यात सांगू शकतो. बेचाळीस सालच्या स्वातंत्र्यसंग्रामात महाराष्ट्रात अनेक क्रांतिवीरांनी भाग घेतला होता. प्रत्येकाचे वेगवेगळे कॅम्प होते. प्रत्येकजण इंग्रज सरकारची शासन-यंत्रणा कशी बंद पाडायची यासाठी आटोकाट प्रयत्न करीत होता. कोणी ठोशास ठोसा या न्यायाने सशस्त्र लढाऊ स्वातंत्र्यसैनिक तयार करून सरकारशी मुकाबला देत होते, तर कोणी रेल्वे पाडणे, तारा तोडणे, पोष्ट ऑफिसे जाळणे, पोलिस स्टेशनावर छापे घालणे, सेवादल चालविणे, शस्त्रास्त्रे तयार करणे, परदेशातून शस्त्रास्त्र मागवणे, सरकारी खजिना लुटणे, उघडपणे व्याख्यानाकरवी लोकजागृती करणे, भूमिगत राहून गनिमी काव्यानं लढणे, सरकारी कचेऱ्या-ऑफिसांचा ताबा घेऊन त्यावर तिरंगी झेंडा लावून आपले स्वतंत्र प्रतिसरकार स्थापन करणे असे अनेक मार्ग स्वातंत्र्यासाठी अवलंबले होते. त्यामध्ये सातारा जिल्ह्यामध्ये (सध्याचा सांगली जिल्हा सुद्धा) क्रांतिसिंह नाना पाटील सरकारला जेरीस आणणारे प्रमुख वीर होते. प्रत्येक कॅम्पच्या वीरास भूमिगत राहून मार्गदर्शन करीत होते. वेळोवेळी क्रांतिसिंहानाही क्रांतिवीर नागनाथ अण्णा सहकार्य देत होते. भारतात पहिल्यांदा नाना पाटील यांनी सातारा जिल्ह्यात प्रतिसरकार स्थापन करण्याचे महान कार्य केल्यामुळे त्यांचा नावलौकिक इंग्लंडमध्ये पसरला गेला होता. नागनाथानी नानांच्या या कार्याला संपूर्ण साथ दिली होती. प्रत्येकांचे मार्ग भिन्न होते; परंतु स्वातंत्र्य

मिळवणं हे एकच उद्दिष्ट व ध्येय होते. कुठल्याही देवाला केलेली भक्ती ही शेवटी एकाच देवाला पोहचते. तद्वत सर्वांना एकच स्वातंत्र्यदेवता प्राप्त करावयाची होती. सर्व नद्या ज्याप्रमाणे समुद्राला जाऊन मिळतात, त्याप्रमाणे सर्व क्रांतिवीर शेवटी क्रांतिसिंह नाना पाटील यांना मानत होते. नागनाथ अण्णा नानांना गुरुस्थानी मानत होते.

"भारत देश स्वतंत्र झाल्यावर महात्मा गांधींच्या तत्वाप्रमाणे देशाचा कारभार चालत नाही, हे खरंखुरं शेतकऱ्यांचं व गोरगरीबांचं राज्य नाही, सरकार धनिक, कारखानदार यांचे गुलाम बनले आहे, अस्पृश्य, स्त्रिया अद्याप गुलामगिरीत आहेत; याचं निरीक्षण करून हे दोघेही राजकारणामधून अलिप्त झाले. राजकारणसंन्यास घेऊन अण्णांनी शिक्षण-कार्यास वाहून घेतले व नानांनी पूर्वीचा आपला पिढीजात भक्तीमार्ग स्वीकारून विठोबाची पूजा-अर्जा, भक्ती करण्यास पंढरपूरास निघून गेले. एवढ्या उतारवयात वयाच्या पंच्याऐशीव्या वर्षी त्यांनी तिथं राहून भक्ती करणे हे अण्णांच्या मनाला बरं वाटलं नाही. त्यांना विनंती करून त्यांनी आपल्या वसतीगृहामध्ये स्वतंत्र खोली देऊन आणून ठेवले व त्यांनी सेवा करण्याची संधी प्राप्त केली. एका महान स्वातंत्र्य-सैनिकाची वृद्धावस्थेत दुर्दशा, अवहेलना होऊ नये म्हणून नानांना वाळव्यात आपल्या घरी आणून ठेवलं. भारतीय लोकांना व सरकारला स्वातंत्र्यसैनिकांची कदर आहे, त्यांची दुर्दशा ते पाहू शकत नाहीं, त्यांना सहाय्य करतात हे आपले सौभाग्य आहे." माधवराव मध्येच म्हणाले की, "साहेबजी ! तुमचं म्हणणं अगदी बरोबर आहे. स्वातंत्र्यसैनिकांची किंमत आपल्या माणसांना फार मोलाची वाटते. मा. अण्णांनी आपल्या क्रांतिवीर नाना पाटील या गुरूची शेवटपर्यंत सेवा केली. या वसती-गृहामध्ये असताना नानांचा एका श्वानाने चावा घेतला. त्यामुळे नानांना मिरजेच्या मिशन हॉस्पिटल मध्ये ठेवण्यात आले. त्यांना इंजेक्शने वगैरे देण्यात आली. वृद्धावस्थेमुळे त्यांची प्रकृती अधिकच खालावत चालली. पुष्कळ उपाय, इलाज करण्यात आले. परंतु दिनांक

६/१२/७६ रोजी काळाने त्यांच्यावर झडप घालून त्यांची इहलोकीची यात्रा इथंच संपवली. त्यांच्या मृत्युची बातमी हांहां म्हणता साऱ्या महाराष्ट्रभर पसरली. नागनाथ अण्णांना ही बातमी सोलापूरला समजताच ते तिथून धावत आले. महाराष्ट्रामधील असंख्य पुढारी, कार्यकर्ते, मंत्री, आमदार, खासदार यांनी त्यांना श्रद्धांजली अर्पण केली. काही व्यक्तींनी त्यांचा अंत्यसंस्कार सांगलीच्या घाटावर, रामानंद भारतीच्या अंत्य-संस्काराशेजारी करण्याचा विचार मांडला. परंतु वाळव्याचे तरुण कार्यकर्ते, नागनाथ अण्णांच्या मातोश्री लक्ष्मीआई यांना तो पसंत पडला नाही. त्यांनी नानांचा अंत्यसंस्कार विधी वाळव्यासच करायचा आहे हे निश्चित व ठामपणे सांगितल्यावर त्यांची अंत्ययात्रा मिरज ते वाळव्यापर्यंत काढण्यात आली. यावेळी लाखो नागरिकांनी त्यांचे अंत्यदर्शन घेतले, घळघळा अश्रू ढाळले. सारा महाराष्ट्र शोकसागरात बुडून गेला. त्यांच्या अस्थी वाळव्यास नागनाथ अण्णांनी जपून ठेवल्या आहेत. त्या ठिकाणी त्यांचे स्मारक उभारण्यात येणार आहे. यासाठी महाराष्ट्र सरकारने या क्रांतिसिंहाच्या कार्याची जाणीव ठेऊन स्मारक-समिती नेमली आहे. काही दिवसात त्यांचे भव्य स्मारक वाळव्यास दिसून येईल. शिवाय अण्णानी आपल्या गुरुचे नाव अजरामर रहावे यासाठी वाळव्यास क्रांतिसिंह नाना पाटील महाविद्यालय सुरू करण्याचे निश्चित केले आहे. अशा प्रकारे मातृ-पितृ, गुरुजन, इष्टमित्र यांच्या-बद्दल नागनाथ अण्णांच्या मनामध्ये प्रेम, आदर, आपलेपणा सतत वास करीत आहे हे स्पष्ट दिसून येईल. साखर कारखान्याच्या सुरुवाती-पासून मी अनेक वेळा अण्णांकडे येऊन विचारविनिमय केला. पुढील आणखी योजना, शंका-कुशंका इत्यादी बाबींची चर्चा करण्यासाठी आलो; त्यावेळी त्यांच्या बोलण्यात आलं की, आपली बेचाळीस सालची संघटना, दोस्ती, मित्रत्व अद्याप अभेद्य व कायम आहे. काही लोकांच्या-मध्ये काही पक्षभेद झाले असले तरी त्यांचा आपल्याशी पूर्वी इतकाच किंबहुना त्याहूनही अधिक घनिष्ठ संबंध वाढला आहे. तेव्हा ज्यावेळी आपला ह. कि. अहीर साखर कारखाना सुरू होईल त्यावेळी माझ्या

या स्वातंत्र्यसैनिक मित्रांच्या प्रत्येक मुलाला मी या कारखान्यात नोकरी देणार आहे. यावरून स्पष्ट दिसून येईल की अण्णा आपल्या बेचाळीस सालच्या स्वातंत्र्यसैनिकांना विसरले नाहीत. महाराष्ट्र सरकारनेही स्वातंत्र्य-सैनिकांना व भूमिगत स्वातंत्र्यसैनिकांना पेन्शन व इतर सवलती देऊन त्यांचा मानसन्मान केला आहे."

"नागनाथ अण्णा अशक्य गोष्टीसुद्धा शक्य करून दाखवतात. यातच त्यांचा मोठेपणा दडलेला आहे. हे आश्चर्य आहे!" असे माधवराव म्हणाले. "साहेबजी! आता मला तुम्ही असं सांगा की त्यांनी जे या वीस-पंचवीस वर्षात नवीन कार्यकर्ते तयार केले आहेत ते त्यांना कितपत सहकार्य देतात?" "माधवराव! अण्णांनी शैक्षणिक व सामाजिक कार्याला सुरुवात केली त्यावेळी त्यांचे पुष्कळ तरुण कार्यकर्ते होते. परंतु शिक्षक, क्लार्क, शाळेचे शिपाई या निर्मळ, निःस्वार्थी त्यागी मनाच्या होतकरू कार्यकर्त्यांनी शिकवण्याव्यतिरिक्त प्रत्येक काम कशा प्रकारे यशस्वी करायचं याचे चांगले ट्रेनिंग त्यांना दिले. त्यामध्ये सर्वश्री अंताजी पाटील, दत्ताजी-राव शेळके, जयवंतराव अहीर, प्रकाश अहीर, के. के. नायकवडी, जयवंत माने, एस. एस. शेटे गुरुजी, ए. डी. मोटे शिक्षणाधिकारी, एस. पी. हावलदार मुख्याध्यापक व त्यांचा सर्व शिक्षकवर्ग, चंदर लोहार, महंमद चाऊस, आजीज चाऊस सर यांचा उल्लेख करणं अत्यावश्यक आहे.

"प्रकाश अहीर व जयवंत अहीर यांची ओळख व परिचय खास. यशवंतराव चव्हाण, मुख्यमंत्री वसंतरावदादा पाटील यांच्याशी करून दिल्यामुळे मुंबई, दिल्लीसारख्या ठिकाणी असलेली कामे ही द्वयी करून आल्याशिवाय रहात नव्हती. अण्णाचं काम कुठल्या सरकारी दरबारी ऑफिसात पडून राहिलं आहे असे होत नसे. नागनाथ अण्णाचे नाव सांगितलं की ते काम झालंच म्हणून समजा. अण्णांना कुठल्या कामासाठी स्वतः हेलपाटे घालण्याची जरूरीच नव्हती. त्यांना भाराभर कार्यकर्ते जमवून कार्य करण्याची आवश्यकता भासली नाही. मूठभर मोजके कार्यकर्ते अहर्निश काम करून कार्य पार पाडण्यास समर्थ होते. दहा-दहा,

वीस-वीस वर्षे ज्यांनी त्यांच्या सहवासात घालवली व जे त्यांच्या विश्वासाला पात्र ठरले त्यांच्यावरच नागनाथ अण्णा अशा मोठमोठ्या जबाबदारीची कार्ये सोपवतात. या साखर कारखान्याच्या कामामध्ये सर्व विद्यालयाच्या शिक्षक कार्यकर्त्यांचा सिंहाचा वाटा आहे. या व्यतिरिक्त त्यांचे शेतकरी कार्यकर्ते, मिरजवाडीचे त्यांचे मामा बा. सं. साळुंखे, ज. ता. खोत, अनंत पाटील, शाम कुंभार, शामराव सव्वासे वाळवा यांनी रात्रंदिवस कारखान्याच्या प्राथमिक पूर्ततेस अमोल सहकार्य केले आहे. मान. शामराव सव्वासे या कारखान्याचे सध्या चेअरमन आहेत."

"नागनाथ अण्णांचे मामा बा. स. साळुंखे हे त्यांचे अत्यंत जवळचे पाहुणे आहेत. त्यांचं गाव मिरजवाडी, यांचा संक्षिप्त परिचय करून दिल्यास अयोग्य होणार नाही." असे माधवराव म्हणाले. "नागनाथ अण्णा हे बाबासाहेबांचे भाचे. ते एक उत्तम शेतकरी आहेत. बेचाळीस सालच्या लढ्यापासून अण्णा व लक्ष्मी माता (त्यांच्या भगिनी) यांच्यावर जी जी संकटे आली ती दूर करण्याचा बाबासोनी आटोकाट प्रयत्न केला. अण्णा भूमिगत असताना त्यांनी सतत वाळव्यात राहून त्यांच्या कुटुंबियांना आधार दिला, लक्ष ठेवले. अण्णांची शिदोरी पोहोचती करण्यास कचरले नाहीत. अण्णांच्या बरोबर काही काळ ते भटकले. अण्णांच्या जिवाला कुठे धक्का पोहोचू नये यासाठी ते नेहमी दक्ष असायचे. यांचे वडील संभाजीराव जमादार असल्याने यांच्याही अंगी धाडस हा गुण बाणला गेला होता.

"अण्णानी शैक्षणिक कार्य सुरू केल्यावर हेही हु. कि. अहीर विद्यालयाच्या स्थापनेपासून आजतागायत काम करीत आले आहेत. कारखान्याच्या स्थापनेमध्येही त्यांनी अमोल कामगिरी केली आहे. कारखान्याच्या जागेचा प्रश्न अती महत्त्वाचा व अवघड असा वाटत होता. तो बाबासाहेबानी अण्णांच्या अपरोक्ष पुष्कळ प्रमाणात मोठ्या कौशल्याने सोडविला आणि कारखान्याच्या जागेची पूर्तता केली. आईच्या हाकेला ते नेहमी तयार! स्वतःचे घर-दार, शेती, बायको, मुलं-बाळं वगैरे संसाराची कधी पर्वा न करता नागनाथ अण्णा व आईनी जे सार्वजनिक काम सांगितले

असेल ते पूर्ण केल्याशिवाय ते कधी गप्प बसले नाहीत. ही धीर-गंभीर, सरळ स्वभावाची, निःस्वार्थी, त्यागी, गरीबांच्या, शेतकरी बंधूंच्या हितासाठी सतत धडपडणारी व्यक्ती आहे. धष्ट-पुष्ट, उंची-पुरी, निरोगी, सावळ्या रंगाची, सतत हसतमुख, गोड बोलणारी व्यक्ती आपल्या मनाचा थांगपत्ता लागू न देता संघटना करण्यात तरबेज आहेत. त्यानीही आपल्या शेतकरी बंधूंची पुष्कळ प्रमाणात संघटना तयार केली आहे. यांचं शिक्षण सातवीपर्यंत झालं आहे. व्यवहारकौशल्य, साहस, मनुष्य-पारख हे गुण त्यांच्यामध्ये दिसून येतील. वाळव्यास होणाऱ्या कारखान्याच्या मोठमोठ्या इमारतींना लागणारा दगड, सिमेंट, विटा, यांची पारख करून कॉन्ट्रॅक्टरना त्यानी माल आणण्यास सहकार्य दिले. आपल्याही परिसरात अशाच पद्धतीचा कारखाना व्हावा अशी त्यांची मनोकामना आहे. आपल्याही भागाचा कायापालट व्हावा असे कोणाला वाटणार नाही ? सर्वांनी सहकार्य दिल्यास सर्वांचे कल्याण व्हायला वेळ लागेल का ? मामांचे मित्र ज. ता. खोत हेही त्यांच्या व अण्णांच्या कार्यात अहोरात्र परिश्रम घेत आहेत. जगन्नाथही अण्णांचे प्रामाणिक मित्र आहेत."

"नागनाथ अण्णांचं वेचाळीस सालापासून आजतागायत येवढं मोठं महान कार्य, व्यक्तिमत्त्व, दबदबा, संघटना-शक्ती, आदर, प्रेम, आपलेपणा, आपुलकी, कौशल्य, धाडस, चातुर्य, निःस्वार्थ, कामाची जिद्द, करेन किंवा मरेन असे सर्व गुण अंगी असताना आणि सन १९५७ साली मुंबई असेंब्लीस निवडून आले असताना ते पुन्हा निवडणुकीस का उभे रहात नाहीत ? आज देशात असल्या नेतृत्वाची गरज आहे. असले नेतृत्वच स्वराज्याचं सुराज्य, रामराज्य केल्याशिवाय राहणार नाही अशी माझी खात्री आहे." असे म्हणून माधवराव व महंमद शरीफ या दोघांनी मिळून मूळ प्रश्नांना हात घातला त्यामुळे मला त्यांच्या प्रश्नाचं निरसन करणं भाग पडलं.

"हे पहा ! तुम्ही मोठा अचूक आणि गहन प्रश्न पुढे मांडला. तुम्ही मोठे धूर्त शिक्षक आहात यात शंका नाही. नागनाथ अण्णा या वीस

वर्षांत पुष्कळ वेळा माझ्या घरी आले आणि वेळ मिळाला नसल्यास अनेक वेळा ते मला वाळव्यास बोलावून घेत होते. प्रत्येक मानवाला आपल्या मनातील साठलेल्या भावना व्यक्त कराव्या लागतात आणि तो आपल्या जिवलग मित्राशिवाय कुठं व्यक्त करू शकत नाही. मित्र हा मनाला विरंगुळा आहे. मी सुद्धा अण्णांना परवा हाच प्रश्न विचारला की, 'अण्णा आम्ही तुम्हांला या निवडणूकीला उभे करणार आहोत' तेव्हा ते म्हणाले की, 'मी या फंदात पडू शकत नाही. निवडून येऊन अधिकार, सत्ता, मंत्रीपद वगैरे मिळवण्याची माझी इच्छा नाही. अधिकार, सत्ता, पद या निर्जीव बाबी आहेत. असल्या मृगजळाच्या पाठीमागे लागणं मला आवडत नाही. सत्ता व अधिकारपद संपल्यावर त्या माणसाची किंमत काहीच रहात नाही. सत्ता व अधिकारावर आल्यावर माणसाला अनेक मोह, स्वार्थ निर्माण होऊन तो बदनाम होतो. समाजात त्याची प्रतिमा डागळलेली असते. त्याला समाज शून्य किंमत देतो. सत्तेवर असताना समाज त्याला डोकीवर घेऊन नाचतो. सत्ता संपल्यावर पायदळी घेतो. समाजसेवा, शिक्षणकार्य, सहकार सुधारणा, हे सत्य, शुद्ध व अमर कार्य आहे. अशी माझी खात्री झाली आहे."

"साहेबजी ! तुम्ही आम्हाला अण्णांच्या कार्याविषयी खूप माहिती दिली. वेळही खूप झाला आहे. परंतु एक शेवटची शंका विचारून विश्रांती घ्यायला काहीच हरकत नाही. अण्णानी एवढं मोठं कार्य केलं आहे की, त्याला तोडच नाही. शिवाय त्यानी बेचाळीस सालात भूमिगत राहून स्वातंत्र्यासाठी देशासाठी जो त्याग, संग्राम केला याची माहिती कुठंच व कुणालाही माहित नाही. त्यानी कधी त्यांच्या नावाचा किंवा कार्याचा गाजावाजा कुठल्या वर्तमानपत्रामधून सुद्धा केला नाही अगर त्यांनी कुणाला सांगितलं नाही. तेव्हा त्यांचे हे चरित्र, कार्य व माहिती तुम्हाला त्यांच्या सहवासात सतत राहून केल्याने मिळाली आहे ती माहिती पुस्तकरूपाने प्रसिद्ध केल्याने देशाच्या भावी पिढीमध्ये राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण झाल्याशिवाय राहणार नाही अशी माझी खात्री आहे."

"माधवराव ! आता तुम्ही विचारलं म्हणून सांगतो की, सन १९४०

सालापासून मी अण्णांच्या सहवासात जिवलग मित्र म्हणून आहे खरा, परंतु त्यांनी कधी कुणाला आपली माहिती सांगितली नाही. त्यांच्या बऱ्याचशा कामाचं मी अगदी जवळून निरिक्षण केलं आहे. मी त्यांच्याबरोबर काम केलं आहे. त्यांना गाजावाजा केलेलं आवडत नाही. मी त्यांच्या सहवासात सहकारी व वर्गमित्र असल्याने त्यांच्या भूमिगत अवस्थेतील घटना मला माहीत होत्या. त्या घटना लक्षात ठेवून पुस्तकरूपाने नागनाथ अण्णांच्या परवानगीने प्रसिद्ध करून वाचकांच्या समोर ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्यावर आजतागायत एकही पुस्तक, साहित्य तरुण पिढीला वाचावयाला मिळालेलं नाही याबद्दल खेद वाटतो. राष्ट्रकवी स्व. मैथिली शरण गुप्त यानी पंचवटीमध्ये म्हटलं आहे की,

> 'बंद नही, अब भी चलते है, नियती नदीके कार्य कलाप,
> पर कितने एकान्त भावसे, कितने शान्त और चुपचाप'

"निसर्गदेवी नेहमी कार्य करीत चाललेली आहे. तिचे कार्य पृथ्वीच्या अंतापर्यंत बंद पडत नाही, किंवा बंद होणार नाही. ती जे कार्य व सेवा करते ते शांत रीतीनं, एकांत भावनेनं आणि गपचूप करीत असते. त्याचा गाजावाजा ती कधीच करीत नाही. या निसर्गदेवतेप्रमाणं अण्णांचं कार्य चालू आहे हे तुम्हाला स्पष्ट दिसून येईल. यालाच म्हणायचं नैसर्गिक खरं-खुरं कार्य." माधवराव म्हणाले, "साहेबजी, तुम्ही अण्णांच्या कार्याचं फार मोठं तत्त्व आम्हाला सांगून अगदी थक्क करून सोडलं; तुमचं सांगणंही अगदी नैसर्गिक वाटलं बरं का! धन्य आहे तुमची व नागनाथ अण्णांची. असलं कार्य करण्यास अण्णांना दीर्घायुष्य लाभो हीच प्रभुचरणी सर्वांची सदिच्छा."

पुढे माधवराव म्हणाले, "साहेबजी, नागनाथ अण्णांच्या जीवनावर बराच महान उलगडा तुमच्या सांगण्यावरून मला कळला. परंतु किसन अहीर आणि नागनाथ अण्णा यांचा एवढ्या जिव्हाळ्याचा संबंध कसा आला याचा बोध मला कळेना तो सांगाल का?"

साहेबजी म्हणाले, "ही खोल व मोठी घटना आहे. सन १९४२ साली महात्मा गांधीनी 'चले जाव' चा ठराव केला. त्यावेळी अनेक तरुणांनी या स्वातंत्र्यसंग्रामात जिवाची परवा न करता स्वतःला झोकून दिले. त्यावेळी नागनाथ अण्णांनी स्वतःचा मॅट्रीकचा अभ्यास सोडून या संग्रामात भाग घेतला होता. दोन तीन महिन्यांतच ब्रिटीश सरकारला हाकलून देण्यासाठी सातारा जिल्ह्यामधील (त्यावेळी सांगली जिल्हाही समाविष्ट होता.) क्रांतिवीरांनी मोठा उठाव केला. जेणेकरून सरकारची शासनयंत्रणा बंद पडेल असा मार्ग त्यांनी अवलंबला. मात्र म. गांधीच्या तत्त्वाप्रमाणे सत्य, अहिंसा, सत्याग्रह, मोर्चा, उपोषण आदि मार्ग प्रत्येकाने कटाक्षाने पाळला होता. या मार्गाने प्रत्येक तालुका आणि जिल्हा स्वतंत्र करण्याची जिद्द सर्वांनी अवलंबली. नाना पाटील यांनी तासगावच्या मामलेदार कचेरीवर फार मोठा मोर्चा नेऊन कचेरीवर मामलेदारच्या हस्ते तिरंगी झेंडा लावला होता. याच पद्धतीने इस्लामपूरच्या मामलेदार कचेरीवर झेंडा लावण्याचा कार्यक्रम आखण्यात आला. पंचक्रोशी-मधील अगणित शेतकरी संघटितपणे, प्राणाची परवा न करता आस-पासच्या खेड्यापाड्यांमधून कार्यकर्त्यांनी टोळी टोळीने जमा केले. पन्नास-साठ हजार जनसमुदाय कचेरीवर चाल करून जाण्यास उत्सुक होता. ब्रिटीश सरकारही तासगावच्या अपमानाने चिडले होते. त्यांनीही असंख्य सशस्त्र पोलिस एक दोन दिवस अगोदरच इस्लामपूरला आणून ठेवले होते. हा प्रयोग अयशस्वी करण्याची जिद्द सरकारने बाळगली होती.

"कुरळपहून पांडू मास्तर, यशवंतराव चव्हाण यांची तुकडी येताक्षणीच सर्व समुदाय गांधी—नेहरूंचा जयजयकार करीत खवळून पुढे चाल करू लागला. सरकारने या नेत्यांना पकडून अटक केल्यामुळे जनसमुदाय अधिकच खवळला. त्यामध्ये वाळव्याचे किसन अहीर पहिलवान अत्यंत बेडर, साहसी, बेदरकार, स्वातंत्र्यप्रेमी होते. त्यांची तुकडी चाल करून कचेरीवर जाण्यास तयार होती. क्षणीच पोलिसांनी हवेत गोळीबार करा-यला सुरुवात केली. जनतेचा जयघोष व बंदुकीच्या काही आकाशातील झडणाऱ्या फेरी यांनी आकाश दुमदुमू लागले. सर्वांच्या कानठळ्या

बसल्या. त्यांत सत्याग्रही किसान तुकडीतून आलेले कामेरीचे विष्णू बारबट्टे व किर्लोस्करवाडीचे कामगार संघटनेचे नेतृत्व करणारे उमा शंकर पंड्या यांना पोलिसांच्या गोळ्या लागून ते ठार झाले, हुतात्मा झाले. समाज सैरावैरा धावत सुटला, क्षणार्धात सर्व समुदाय पांगला गेला. प्रत्येक-जणाने आपआपला प्राण वाचवण्यासाठी घर, हॉटेल यांचा आश्रय घेतला. हे दृश्य नागनाथ अण्णांनी पाहिल्यावर त्यांच्या मनात उपरती झाली की, लाखाचा समुदाय बंदुकीच्या फैरीने पांगला, शिवाय दोन सोन्यासारख्या तरुणांचा बळी पडला. अधिक चाल केली असती तर कित्येक बळी पडले असते. तेव्हा ब्रिटीश सरकारला शस्त्रानेच उत्तर दिल्याशिवाय चालणार नाही. हा निश्चय त्यानी मनात पक्का करून ते या फौजी शिक्षणाच्या मार्गाला लागले."

माधवराव मधेच म्हणाले, "फौजी शिक्षण देण्यासाठी बंदुकी, दारूगोळा काडतुसे अशी शस्त्रास्त्रं असल्याशिवाय हे कार्य करता येणं शक्य नव्हतं. शस्त्रं मिळाली तर फौजी शिक्षण देणारे सैनिक अधिकारी हवेत. त्या काळी शस्त्रास्त्रं मिळणं फार कठीण, त्याहून शिक्षण देणारे अधिकारी मिळणं अशक्य आहे. ब्रिटीश सरकारनं भारतीय लोकांच्या हातात फक्त चुली फुंकायच्या फुंकण्याच ठेवल्या होत्या. कुणाच्या घरी भाला, कुऱ्हाडसुद्धा ठेवली नाही; ती सुद्धा हत्यारे जप्त केली आहेत. अशा वेळी अण्णांनी हा शस्त्रास्त्रांचा प्रश्न कसा सोडवला त्याची कल्पनाच केलेली बरी."

साहेबजी म्हणाले, "माधवराव, तुमचा विचार बरोबर आहे. शस्त्रास्त्रं मिळवणं साधी गोष्ट नव्हती. परंतु नागनाथ अण्णांनी ही समस्या कशी सोडवली हे एक आश्चर्य आहे. अण्णा ही अत्यंत जिद्दी, कल्पक, समय-सूचक, प्रयत्नवादी, धोरणी, मुत्सदी अशी व्यक्ती आहे. एक वेळ त्यानी एखादे कार्य करण्याचा निश्चय केला की त्यात आपला प्राण गेला तरी चालेल परंतु ते कार्य केल्याशिवाय राहणार नाहीत.

"प्रत्येक गावामध्ये ब्रिटीश सरकारने काही गावकामगार पाटलांकडे लायसन्सच्या काही मोजक्या बंदुका दिल्या होत्या. त्या आपल्याला देशकार्यासाठी मिळणं अशक्य आहेत हे त्यानी ओळखलं. त्यांच्याकडे

जाऊन मिळणार नाहीत हेही त्यानी पूर्ण जाणलं होतं. कोल्हापूरच्या संस्थानामधील सरदार, इनामदार, जहागिरदार अशा लोकांकडे शिकारी-साठी असलेल्या बऱ्याच बंदुका त्यानी मिळवल्या. शिवाय खेड्यापाड्या-मधील लायसन्सधारी बंदुकाही मिळवल्या. त्यानंतर सागावच्या पोलिस आऊटपोस्टमध्ये चार-पाच बंदुका गाफील पोलिसांच्या कमरेला मिठ्या मारून, पोलिसांना बांधून घालून लंपास केल्या. सातारच्या क्रांतिकारकांनी संध्याकाळी कोडोलीचं टपाल घेऊन जाणाऱ्या मोटारीत एक नेहमी हत्यारी पोलिस असायचा ही बातमी मिळताच क्रांतिकारकानी ही मोटार बंदुका रोखून अडवली. बरेच बंदुकधारी पाहून त्या पोलिसाला आपली बंदुक त्यांच्या हवाली करणं भाग पडलं. पोस्ट खात्याचा बराच पैसाही त्यावेळी त्यांना मिळाला. तो शस्त्रखरेदीस उपयोगी पडला. फुकट शस्त्रं मिळवण्याचा मार्ग खुंटला. आता पैशाशिवाय शस्त्रं मिळणार नाहीत याची खात्री झाल्यावर सरकारचाच पैसा लुटून शस्त्रं खरेदी करायचा सपाटा चालू केला. ७ जून १९४३ ला मोठ्या चतुराईन २० हजारांची 'शेणोली पे सर्व्हिस' लुटली. हाही पैसा शस्त्रं खरेदी करण्यास अपुरा पडू लागला म्हणून क्रांतिकारकांनी खानदेश जिल्ह्यात प्रवेश केला. तिथं काही महिने राहिल्यावर १४ एप्रिल १९४४ ला धुळयाचा साडेपाच लाखाचा खजिना लुटला."

महंमद शरीफ व माधवराव म्हणाले, "१४ एप्रिल १९४४ ला जो धुळयाला साडेसात लाखांचा खजिना त्याकाळी या क्रांतिकारकांनी लुटला त्याची हकीकत आम्हाला सांगायला हवी. याबद्दल आम्हाला फारच मोठी आतुरता निर्माण झाली आहे."

साहेबजी म्हणाले, "तुमचं म्हणणं अगदी बरोबर आहे. याची भयंकर भयानक व फार मोठी कहाणी आहे. ती तुम्हाला यावेळी थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न करतो.

शिवाजी महाराजानी हिंदी स्वराज्याची स्थापना करण्यासाठी ज्याप्रमाणे कल्याणचा खजिना लुटला तद्वत या वीरांनी इंग्रज सरकारचा खजिना लुटून आझाद हिंद सेनेसाठी व भारत देश स्वतंत्र करण्यासाठी, आपली

फौजी सेना, संघटना बळकट करण्याकरिता धुळ्याचा खजिना लुट-ण्याचा दृढनिश्चय केला! याकरिता धुळ्यापासून नंदुरबारपर्यंत सर्व अधिकाऱ्यांशी संधान बांधून ठेवले होते. नंदुरबारहून येणारा खजिना धुळ्याच्या ट्रेझरीमध्ये जमा होत असे. सदरचा खजिना रस्त्यावरच लुटा-यची १४ एप्रिल तारीख निश्चित करण्यात आली. स्वातंत्र्यलढ्यासाठी फार मोठी मदत होणार आहे अशी सर्वांची खात्री झाली व तीस-पस्तीस वीर धुळे शहरात आले. शहरात फूटपाथवरून चालण्याची काही लोकांना माहिती नसल्याने ते रस्त्यावरून चालत होते. शहरामध्ये अशा प्रकारे साईड सोडून फूटपाथवरून न चालणाऱ्या लोकांना ड्यूटीचा पोलिस शीळ घालून त्यांना मागे बोलावणं साहजिक होतं. तेव्हा रस्त्यावरून चाल-णाऱ्या या स्वा. सैनिकांना पाठीमागे बोलवत असताना त्यांच्या मनात अशी शंका आली की, धुळ्याचा खजिना लुटण्याचा आपला बेत कदा-चित् या पोलिसांना समजला असला पाहिजे. म्हणूनच तो आपल्याला बोलवत असावा. म्हणून हे सर्व स्वा. सैनिक रस्त्यावरून पळत सुटले. त्यांच्या पाठोपाठ हा पोलिसही पळत सुटला!! या स्वा. सैनिकांनी स्वतःच्या मनाशी असा विचार केला की हा खजिना लुटायच्या आधीच आपणाला या धुळ्याच्या जेलमध्ये धूळ खात पडण्याचे संकट आपण होऊन आपणावर ओढवून घेऊ नये. म्हणून त्या पोलिसाला झुकांडी देऊन सत्तावीस-अठ्ठावीस स्वा. सैनिक परत निघून सातारा जिल्ह्यात आले.

या धुळे शहराच्या फूटपाथवरून चालत असलेले क्रांतिवीर नागनाथ अण्णा, श्री. डी. जी. लाड, श्री. रावसाहेब कळके, श्री. धोंडीराम माळी व अन्य तीन असे सातच स्वा. सैनिक शिल्लक राहिले. हा काय प्रकार झाला याची जाणीव त्यांच्या लक्षात चटकन् आली. जे निघून गेले त्यांना शहरात कुठं शोधायचं? जे गेले त्यांचा विचार त्यांनी केला नाही व हतबल, निराश न होता ते आपले ध्येय पूर्ण करण्याच्या मार्गास लागले.

या सात स्वातंत्र्यसैनिकांनी (सप्तर्षी) अन्य साथीदारांची पर्वा केली नाही. काहीही होवो! धुळ्याचा खजिना लुटण्याचा दृढनिश्चय त्यांनी

केला. धुळ्यापासून अंदाजे पाच-सहा मैलावर नंदुरबार रस्त्याला येऊन थांबले. दुपारचे दोन-तीन वाजले असावेत. नंदुरबारहून धुळ्याकडे येणारी प्रत्येक पॅसेंजर मोटारगाडी अडवायचा प्रयत्न करीत होते! यासाठी त्यांनी एक युक्ती शोधली.

क्रांतिवीर नागनाथ अण्णा व क्रांतिवीर जी. डी. लाड हे दोघे रस्त्यावरच मारामारी (लुटुपुटुची) करायचे! फायटिंग करायचे! या मारामारीची पद्धत अशी की भांडत भांडत दोघांची डोकी रस्त्याच्या मध्यावर व पाय मात्र रस्त्याच्या दोन्ही बाजूस असायचे! महंमद शरीफ म्हणाले, "असं करायचं कारण काय?" साहेबजी म्हणाले, "फक्त वाहन अडवण्यासाठी अशा लुटुपुटुच्या मारामारीचं हे नाटक या धूर्तवीरांनी रचलं होतं!"

नंदुरबारहून खजिन्याच्या गाडीमध्ये दोन बंदुकधारी म्हातारे पोलिस मागे बसलेले होते आणि त्या गाडीमध्येच आपले दोन स्वातंत्र्यसैनिक त्यांच्या शेजारीच बसलेले होते. ही योजना अगोदरच करून ठेवलेली होती!

प्रत्येक येणारी गाडी अडवायचा प्रयत्न चालू होता. गाडी उभी राहिली की आपले पाच अन्य स्वातंत्र्यसैनिक गाडीत चढून दोन पोलिस व आपले दोन स्वातंत्र्यसैनिक त्यामध्ये आहेत का नाहीत याची खात्री करून घेत असत. मग त्यामधील एक स्वातंत्र्यसैनिक नागनाथ अण्णा व जी. डी. लाड यांच्या कानात हळूच येऊन सांगत असे की, 'ही गाडी न्हवं, आता उठा!'

अशा प्रकारे पाच-सहा गाड्या गेल्यावर शेवटी दुपारी चारच्या सुमारास खजिन्याची गाडी एकदाची आल्यावर या दोघा वीरांचे भांडण पूर्ववत सुरू झाले. भांडणाऱ्या व भांडण सोडवणाऱ्या लोकांची रस्त्यावर एकच गर्दी झाल्याने खजिन्याच्या गाडीला पुढे जाणे अशक्यच झाले. ड्रायव्हरला नाइलाजास्तव गाडी उभी करावी लागली. उभ्या असलेल्या लोकांना स्वातंत्र्यसैनिक सांगू लागले की, 'मित्र हो! हे दोघे आम्हाला ऐकत नाहीत. तुम्ही तरी यांचं भांडण सोडवा. रस्त्यावर भांडण बरं आहे का?' ठरल्याप्रमाणे दोघा-तिघांनी गाडीत चढून खात्री करून

घेतली. पूर्वीच अधिकाऱ्याशी संगनमत करून खजिन्याच्या गाडीत बसून आलेल्या स्वातंत्र्यसैनिकांना डोळयांनं इशारा करताच त्यांनी पोलिसांच्या बंदुकी हिसकावून घेताक्षणीच दोन म्हाताऱ्या पोलिसांनी आरडा-ओरडा करायला सुरूवात केली. त्याबरोबर ड्रायव्हरला शंका येऊन त्याने गाडी सुरू करून पळवायचा प्रयत्न केला. कारण पर्यायाने खजिन्याची बरीचशी जबाबदारी त्याच्यावरही होतीच. दोन क्रांतिवीर रस्त्यावर भांडण करीत पडलेले आहेत हे पाहून सुद्धा त्या ड्रायव्हरने त्यांच्या अंगावरून सुद्धा गाडी घालायचा घाट घातला! गाडीचा आवाज झाल्याबरोबर दोघे दोन्ही बाजूस पलटी मारून उभे राहिले! नमुन्यावारी हे दोघे वीर या गाडीखाली बळी जात होते; क्रांतिवीर नागनाथ अण्णाना त्या ड्रायव्हरचा मनस्वी राग आला. गाडी पुढे भरधाव निघून पुढे जाताक्षणीच नागनाथ अण्णानी धावत धावत वाघासारखी झेप घेऊन ड्रायव्हरच्या बाजूने गाडी पकडली व कंपार्टमेंटच्या बाजूला उभा राहून ड्रायव्हरला तीन वेळा गाडी उभी करण्याची सूचना दिली. तरी देखील त्याने गाडी उभी केली नाही! मग मात्र नागनाथ अण्णांनी त्याच्या मनगटावर पिस्तूलची गोळी घातली. त्याबरोबर ड्रायव्हरने हा प्रकार काही वेगळाच आहे हे ओळखलं व प्राणावरचं संकट मनगटावरच निभावलं गेलं हे ओळखून गाडी उभी केली. गाडीमधील लोक भयभीत झाले होते. प्रत्येकजण श्वास रोखून स्वस्थ बसलेला होता! आरडा–ओरडा, दंगा–गोंगाट, धावपळ–गडबड वगैरे कोणी काही हालचाल केली नाही. पुढे आड मागे विहीर अशी त्यांची अवस्था झाली होती. पुढे पिस्तुलधारी स्वातंत्र्यवीर सैनिक होते. नागनाथ अण्णानी लोकांना सांगितले "बंधुनो! तुम्ही काही घाबरू नका, हा सर्व देशासाठी, स्वातंत्र्यासाठी जीवन संग्राम चालू आहे." या वाक्याने आपोआपच सर्वांची सहानुभूती प्राप्त झाली. या सात (सप्तर्षी) स्वा. सैनिकांनी आपल्या आतील दोन स्वा. सैनिकांच्या सहाय्याने गाडीमधील खजिन्याची पेटी बाहेर घेतली. त्यांनी ती पेटी फोडली. पेटीमधील नोटांची बंडले भराभर बाहेर काढून धोतरांची चार भली मोठी–मोठी गाठोडी बांधली आणि आपल्या चार स्वातंत्र्यसैनिकांच्या

डोक्यावर देऊन त्यांच्याबरोबर क्रांतिवीर रावसो कळके यांना पुढे जाण्यास सांगितले.

क्रांतिवीर नागनाथ अण्णा, जी. डी. लाड. व अन्य तीन स्वा. सैनिक असे पाच वीर पाठीमागे राहिले. कदाचित् पाठीमागून काही संकट आले तर त्यांच्याशी प्रतिकार केला पाहिजे हा त्यांचा उद्देश होता.

भारतावर इंग्रज सरकारनं जवळ जवळ एक-दीडशे वर्षे राज्य केलं. हिंदी जनतेला त्यांनी मेंढराप्रमाणं जगवलं, खूप अन्याय, अत्याचार केले. जनतेवर एवढा दरारा, दबदबा व धाक होता की अडाणी हिंदी खेडवळ लोक म्हणायचे "इंग्रज सरकारच्या राज्यात काठीला सोनं बांधून काशीला गेलो तरी काही धोका नसायचा." खरं आहे! त्यांनी भारतामधील सर्व सोनं नाणं धुवून नेलं होतं, मग काठीला सोनं बांधायचं कुठलं? त्यांनी आमच्या हातात कागदांच्या नोटांची (पंचम जॉर्जचा शिक्का मारलेली) बंडलं ठेवली होती. तो काही इंग्लंडमधल्या सोने, चांदी, रत्ने-माणके, जड-जवाहिऱ्यांचा खजिना नव्हता. तो आता भारतमातेचा नोटांचा खजिना होता, तेव्हा भारतीय जनतेला वाईट वाटण्याचे कारण नाही.

खजिन्याबरोबर आलेला कॅशियर धुळ्याला जाऊन थडकला. त्यानं झालेला, घडलेला सर्व प्रकार अधिकाऱ्याला जाऊन सांगितला. त्याबरोबर इंग्रज अधिकाऱ्यांच्या काळजात धस्स झालं! त्याला आपला हा भयंकर, भयानक व दारूण पराभव वाटला! हे महान क्रांतिवीर असले पाहिजेत, तरी पण यांचा पाठलाग केला पाहिजे म्हणून त्याने धुळ्याहून पोलिस लॉऱ्या, घोडेस्वार, खाजगी लायसन्स बंदुकधारी सेना पाठविली. अशी त्या पांच पांडवांना (स्वा. सैनिकांना) पकडण्यासाठी जणू काय ही कौरव सेना धावत येत होती. आता या ठिकाणी कौरव-पांडवांची लढाई सुरू झाली म्हणावयास हरकत नाही. या क्रांतिवीरांच्या हाती स्वतःचे संरक्षण करण्याकरिता शस्त्रं होती यात शंका नाही. स्वातंत्र्यासाठी प्राणावर उदार झालेल्या या पांच वीरानी त्यांना डोंगर, ओढे-नाले, झाडे-वेली, खाच-खळगे, चढ-उतार यामधून झुकांडी देत-देत गनिमी काव्याने लढत-लढत दहा-बारा कि. मी. अंतरावर आले होते. क्रांतिवीरांची धुळ्याच्या पोलिसांनी

भयानक भीती घेतली. यावेळी सायंकाळचे सात-साडेसात वाजले असावेत. अंधार पडलेला होता. अधिक पाठलाग केला तर आपली धडगत होणार नाही असं ओळखून त्यांनी धुळ्याच्या दिशेने पाठीमागे वळूनसुद्धा न पाहता धूळ खात खात धूम ठोकली. धुळ्याच्या सेनेला धुळ्यातच धूळ चारली असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

पोलिसांच्या बरोबर लढा देत पाठिमागे थांबलेल्या आपल्या सहकारी मित्रांची वाट पहात एका झाडाखाली रावसाहेब कळके व अन्य तीन स्वा. सैनिक ठरलेल्या ठिकाणी उभे राहिलेले होते. त्यांनी सर्व खजिना नांगरटीमध्ये पुरून टाकला होता, त्या ठिकाणी हे पांच क्रांतिवीर पोहोचले. नांगरटीमध्ये पुरलेल्या सर्व नोटा या नऊ वीरांनी अंधाऱ्या रात्रीत शोधून काढल्या; परंतु त्या सर्व नोटा त्यांच्या हाती लागतील कशा? जेवढ्या सापडल्या तेवढ्या घेऊन ते आपल्या ठरवलेल्या ठिकाणी मुक्कामास आले. एका शेतकऱ्याच्या घरात त्यांना आश्रय मिळाला होता. ते या गावामध्ये येऊन पोहोचताहेत तोपर्यंत पुन्हा धुळ्याहून पोलिसांच्या लॉऱ्या धावत आल्या. या गावची नाकेबंदी केली होती. गावात त्यांनी तपास सुरू केला. परंतु काही थांगपत्ता लागला नाही. या शेतकऱ्याकडेही त्यांनी तपास घेतला; पण त्या कुणब्याने थांगपत्ता लागू दिला नाही. "पोटचं द्यावं पण पाठचं देऊ नये." अशी एक म्हण आहे. तद्वत या कुणब्याने केले. आपल्या घरी आश्रयास आलेल्या क्रांतिवीरांचा सुगावा याने दिला नाही. काही पोलिस त्या ठिकाणी थांबले व बाकीचे पुढच्या गावी निघून गेले. अशा प्रकारे ते पुढे पुढेच जात होते. इकडे या स्वातंत्र्य-सैनिकांनी एक बैलगाडी (तट्ट्या बांधून) जोडली, त्यामध्ये रिकाम्या दुरड्या बांधून ठेवल्या व एक मुलगी त्यामध्ये बसवून, मुलीची पाठवणी भासवून ते त्या गावामधून बाहेर निघून गेले. पुन्हा नोटा पुरलेल्या ठिकाणी जाऊन (बैलगाडी थोड्या अंतरावर थांबवून) त्या नांगरटीमधून पुष्कळ नोटांची बंडले शोधून आणली आणि त्याच गाडीमधून, त्याच गावी, त्याच शेतकरी राजाच्या घरी सर्वजण आले.

क्रांतिवीरानी नऊ-दहा सिमेंटच्या पोत्यामध्ये ही नोटांची बंडले कुचुन

कुचुन भरली व तोंडे शिवून टाकली. यांच्याजवळ एवढे अमाप धन (नोटांची बंडले) पाहून त्या शेतकऱ्याच्या तोंडाला पाणी सुटणं साहजिक आहे! स्वार्थासाठी मनुष्य वाटेल ते दुष्ट कृत्य करायला तयार असतो. मग तो आपला-तुपला, पाठचा-पोटचा याचा तिळमात्र विचार करीत नाही. क्रांतिवीर नागनाथ अण्णांनी या शेतकऱ्याच्या चेहऱ्यावरील भाव ओळखून व या शेतकऱ्याने आपणाला केलेले सहकार्य, आश्रय व खाणं-पिणं यांचा सारासार विचार करून व्यावहारिक दृष्टिकोनातून त्या शेतकऱ्याच्या कृतज्ञतेची पूर्ण जाणीव ठेवून त्याला सांगितले की, 'दादा एक पाटी घेऊन या.' त्या शेतकऱ्याने एक भली मोठी पाटी आणून त्यांच्यासमोर ठेवली. त्याला वाटले बैलासाठी काहीतरी भूस–भरडा आणून देणार असतील! परंतु नागनाथ अण्णानी त्याची पाटी भरून नोटांची बंडले त्या शेतकऱ्यास दिल्याने तो दि.ङमूढच झाला!! याला म्हणतात, कृतज्ञ भाव! सर्वांनी त्याला बजावून सांगितले की, तू हा प्रकार, ही घटना किंवा ही माहिती जर कुणाला सांगितलीस तर त्याचे दुष्ट परिणाम तुला भोगावे लागतील आणि तुझ्या वंशाला दिवा सुद्धा राहू देणार नाही! या क्रांतिवीरांचा मंत्र या शेतकऱ्याने शेवट-पर्यंत पाळला.

अशा प्रकारे भारतामधील अनेक बहुजन समाजातील लोकांनी जिथं तिथं या क्रांतिवीर स्वातंत्र्यसैनिकांना प्राणापलिकडे अती अमोल असे अंतःकरणापासून सहकार्य केले आहे. त्या सर्वांचे हार्दिक अभिनंदन करतो. त्यांना धन्यवाद देतो! भारत सरकार व महाराष्ट्र सरकारनेही सर्व आणि भूमिगत स्वा. सैनिकांची सुद्धा कदर केली, सन्मान केला; अर्थ सहाय्य व पुष्कळ सवलती दिल्या आहेत. त्याबद्दल शासनाचेही आभार मानावेत तेवढे थोडे आहेत. देश स्वतंत्र झाल्यावर शासनानं क्रांतिवीरांची मिटिंग घेऊन या धन-शस्त्रांचा उपयोग देशकार्यासाठी कसा-कसा केला हे ऐकून समाधान व्यक्त केले; धन्यवाद दिले. सर्वांनी शस्त्रे शासनाच्या हवाली केली.

महमंद शरीफ म्हणाले, "तुम्ही आम्हाला न भूतो न भविष्यती असा

'अती मोलाचा' ज्ञानाचा खजिना सांगून भारावून टाकले. हा जिवंत चित्रपट माझ्या डोळ्यासमोर उभा राहिला आहे. हा खजिना आम्ही कधी विसरणार नाही. धन्य धन्य. ते क्रांतिवीर! धन्य ती भारत माता...!! भारतमाते, तुझ्या कुशीत वाढलेले सुपूत्र वाया जातील काय? अशा वीरांनीच इंग्रजाना सळो की पळो करून सोडलं! म्हणूनच भारतमाता स्वतंत्र झाली यात शंका नाही." असे उद्‌गार महंमद शरीफ यांच्या तोंडून निघाले. साहेबजी म्हणाले, "धुळ्यांचा खजिना हाती आल्यावर नागनाथानी गोव्याला प्रयाण केले आणि तिथून लांब पल्याच्या बंदुका, दारूगोळा, काडतुसे खरेदी करून गुपचूप हातोहात त्यांच्या फौजी संघटनेमध्ये येऊ लागल्या. नागनाथ अण्णा एवढ्यावर थांबले नाहीत. त्यांनी म्हैसूरचे समाजकल्याण मंत्री वसंतराव पाटील यांच्याशी संधान बांधले होते. त्यांच्या कडे काही शस्त्रांची मागणी केली होती. त्यांनी बेळगावचे मिलिटरीच्या लोकांशी संधान बांधून दोन स्टेनगन नागनाथ अण्णांच्याकडे रवाना केल्या. अशा प्रकारे त्यांनी हत्यारे मिळवली. शेकडो तरुण स्वेच्छेने या लष्करी शिक्षणासाठी गावा गावामधून फौजी संघटनेत सामील झाले. परंतु कुणालाही साधी परेडसुद्धा करता येत नव्हती. यासाठी लष्करी शिक्षण देणाऱ्या तज्ञ माणसाची जरुरी होती. ब्रिटीशांच्या काळात शाळा कॉलेजमधून सध्या जसे एन. सी. सी. चे लष्करी शिक्षण दिलं जातं तसं हे शिक्षण कुणालाच दिलं जात नव्हतं. जो मिलटरीत भरती होईल त्यालाच याचं शिक्षण मिळत असे.

आता मोठा यक्षप्रश्न नागनाथ अण्णांच्या पुढे उभा राहिला. लष्करी शिक्षण देणारी व्यक्ती कोठून आणायची? अण्णा मोठे चतुर. ते जरी भूमिगत अवस्थेत होते तरी मधून मधून वर्तमानपत्रे वाचत होते. त्यांनी वर्तमानपत्रात वाचलं होतं की, सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेमधील धील्लन, सैगल व शहानवाज यांच्यावर ब्रिटीश सरकारने लष्करी खटला भरला होता. या सेनानींच्या खटल्याच्या मदतीकरिता दरियागंज येथे कचेरी उघडण्यात आली होती. सरदार वल्लभभाई पटेल यांच्या कन्या मणिबेन या त्यांच्या प्रमुख होत्या. अण्णांच्या भाबड्या मनाला

वाटलं, त्यांच्याकडे जाऊन आझाद हिंद सेनेमधील दोन लष्करी शिक्षण देणारे तज्ञ घेऊन येऊ. म्हणून ते भूमिगत अवस्थेत असताना दिल्लीस निघून गेले. पत्ता शोधून काढला, मणिबेनला भेटले. त्यांना ही सर्व हकीकत सांगितली. परंतु मणिबेन म्हणाल्या "फौजी संघटना गांधींच्या तत्वज्ञानात बसत नाहीत." यामुळे नागनाथ निराश होऊन खुर्चीवर काही वेळ बसून राहिले. त्यांचं हे करारी वाक्य ऐकून पुढे काय बोलण्यासारखे राहिले नव्हते. अण्णा आशावादी होते, पण निराशेने परत येण्याच्या विचारात असताना, दोन उंचेपुरे तरुण लष्करी वेषात मणिबेनना भेटण्यास आले. त्यांनी मणिबेनना प्रणाम केला. हिंदीत त्यांनी आपली माहिती दिली. आपल्याला लष्करी स्वरूपाच्या संघटना उभ्या करावयाच्या आहेत आणि तशा पद्धतीचं काम आपल्याला हवं आहे. परंतु मणिबेननी त्यांना "फौजी संघटना गांधींच्या तत्वज्ञानात बसत नाहीत." हेच उत्तर दिलं. त्यामुळे ते तरुण निराशेने निघून गेले. अण्णाना हिंदी कळलं होतं. त्यांच्या आशेला अंकुर फुटला होता. ते दोघे जवान कुठे जातात ते त्यांनी पाहिले. मणिबेनना नमस्कार करून त्या दोन शीख तरुणांच्या दिशेने निघाले. काय योगायोग आहे. माझेच विचार या दोन तरुणांच्यामध्ये वास करत आहेत. समसमान विचारांचा संयोग जाहला; काय ही विधी घटना ! नागनाथानी त्यांना पळत जाऊन गाठले आणि आपली सातारा जिल्ह्यामधील फौजी संघटना, शस्त्रास्त्रं, दारूगोळा इत्यादीची सर्व माहिती दिली. हे दोन तरुण सुभाषबाबूंच्या तालमीत तयार झाले होते. स्वातंत्र्यास्तव वेडे झालेले हे तरुण, एकाचं नाव मन्नासिंग आणि दुसऱ्याचं नाव होतं नानकसिंग. सुभाषबाबूंची आझाद हिंद सेना ज्यावेळी ब्रह्मदेशात आली त्यावेळी ब्रिटीश सरकारने एक शीख रेजिमेंट त्यांच्या बंदोबस्ताकरता पाठवली होती. परंतु ही रेजिमेंट आझाद हिंद सेनेला जाऊन मिळाली होती. त्याचा पाडाव ब्रिटीश लष्कराने केला आणि त्या सर्व शीख रेजिमेंटला कलकत्त्याजवळ कॉन्सनट्रेशन कॅम्पमध्ये आणून ठेवले होते. त्यांच्याभोवती विजेच्या तारेचे कुंपण होतं; शिवाय कडक पहारा होता. या बंधनामधून या दोन शीख

तरुणांना बाहेर निघायचे म्हणजे शुक्रदेवाच्या उदरामधून कचदेव व देवयानी बाहेर येण्यासारखे अवघड काम होते. परंतु हे दोन तरुणही स्वातंत्र्यास्तव वेडे झालेले होते. सहा शीख तरुणांनी या कॅम्पमधून बाहेर लांबपर्यंत एक बोगदा खणून त्यामधून ते बाहेर पडले होते आणि दिल्लीस दरियागंज येथे मणिबेनना भेटून आपली इच्छा प्रकट करण्यास आले होते. हे दोन तरुण अण्णांच्या बरोबर सातारा जिल्ह्यामध्ये लष्करी शिक्षण देण्यासाठी यावयास तयार होते. परंतु ते आपल्या घरच्या लोकांना भेटण्यासाठी उत्सुक झाले होते. अण्णांना त्यांच्या बरोबर पंजाबमध्ये त्यांच्या गावी जाणे भाग पडले. त्यांनी आपल्या घरचे आई, वडील, भाऊ, बहीण यांना भेटून त्यांचा निरोप घेऊन अण्णांच्या बरोबर ऐतवड्यास येऊन दाखल झाले. याला म्हणतात भगीरथ प्रयत्न, सर्वांना अण्णांच्या या कामगिरीमुळे अत्यानंद झाला. ऐतवडे हे गाव क्रांतिकारकांचे केंद्रस्थान बनले. पै. किसन अहीर, ना. अण्णा, पै. बाळकू बिरनाळे, वाय. सी. पाटील, राजमती पाटील (ताई) इत्यादी कार्यकर्ते अधिक उत्साहाने कामाला लागले."

महंमद शरीफ मध्येच म्हणाले, "अहो, या फौजी संघटनेत स्त्रियांनीही भाग घेतला होता काय? ह्या ताई कोण, कुठंल्या? यानी काय काम केलं?" महंमद शरीफ तुम्ही बराच वेळ नुसती आमची हकीकत ऐकून घेण्याचं काम करीत होता. आता मात्र तुमची जिज्ञासा जागृत झाली ही फार चांगली गोष्ट आहे. अहो, ह्या ताई जैन समाजापैकी होत्या, जैन समाजला लोक भित्रा म्हणतात; परंतु तो भित्रा म्हणता येणार नाही. पै. बाळकू बिरनाळे हेही अण्णांचे साथीदार जैनच होते. बरेच सैनिक हे याच समाजामधील होते.

ऐतवडे हे मूळचं गाव त्यांचे वडील शेती व्यवसाय करीत होते. वयाच्या अकराव्या वर्षी त्या सोलापूरच्या पद्मश्री सुमतीबाई शहा यानी मुलींच्याकरिता चालवलेल्या श्रमिकाश्रमात शिक्षणाकरिता येऊन राहिल्या होत्या. बालपणी राजमतीच्या एका चुकीमुळं, ती चिमणीमध्ये तेल घालीत असता रॉकेलचा डबा पेटला. त्यांची आई तो विझवत असताना

त्यातच मरण पावली. त्यामुळे तिच्या कोवळ्या मनावर परिणाम होऊन ती विरागी वृत्तीची बनली होती. ४२ चा लढा सुरू झाला शिकत असतानाच राजमती 'ताईनी' त्यात भाग घेतल्यामुळे त्यात शिक्षा होऊन, त्याना येरवड्यात पाठवण्यात आलं. तेथून सुटून आल्यानंतर त्यांची त्या भागात भूमिगत राहून काम करणाऱ्या नागनाथ अण्णा, बाळकू बिरनाळे, वाय. सी. पाटील वगैरे जहाल क्रांतिकारकाशी गाठ पडली. धर्मानं जैन, परंपरेनं अहिंसावादी असलेल्या या एकवीस वर्ष वयाच्या वीर तरुणीनं हातात शस्त्र घेतलं. आपल्या सहकार्यांच्या सहाय्याने या भागातील प्रथम इरसाल गुंडांचे बळी घेतले. अनेक कार्यकर्त्यांना शस्त्र चालविण्यास प्रवृत्त केलं. नागनाथांच्या फौजी संघटनेद्वारा साम्राज्यशाही खिळखिळी झाली पाहिजे असे ठाम मत बनले व नागनाथांच्या फौजी संघटनेत मोठ्या उत्साहाने भाग घेतला. सर्व फौजी सेनानी बंधूच्या खाण्यापिण्याची सोय करण्याची जबाबदारी 'ताईनी' आपल्यावर घेतली. वाळवे तालुक्याच्या खेड्या-पाड्यामधून शेकडो पोती धान्य ऐतवड्यास येऊन पडू लागली. अशा या वीर क्रांतिकारक 'ताई' या नावाने प्रसिद्ध झाल्या. स्वातंत्र्यानंतर त्यांनी स्वधर्मी पै. बाळकू बिरनाळे यांच्याशी विवाह केला. त्यांची एक कन्या कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या नातूशी विवाहबद्ध झाल्या आहेत."
महंमद शरीफ म्हणाले, "स्त्री जातीनं भूमिगत राहून स्वातंत्र्यासाठी लढा देणाऱ्या ताईची स्तुती करावी तेवढी थोडीच आहे. तुमच्या फौजी संघटनेचं पुढं काय झालं ते आम्हांला सांगा म्हणजे आमचे समाधान होईल."

"ऐतवड्यापासून दोन मैलावर ढगेवाडीचं जंगल क्रांतिकारकांनी कॅम्प-करता निवडलं. शांत जंगल, लष्करी आवाज, बंदुकांच्या फैरीनी दुमदुमलं, नवचैतन्य निर्माण झालं. ही बातमी वाऱ्यासारखी पाच–पन्नास मैलाच्या टापूत पसरली. संघटनेत सामील होणाऱ्या तरुणांची संख्या सारखी वाढू लागली. त्यामुळे दारूगोळा, काडतुसे, बंदुका कमी पडू लागल्या, त्यावेळी कोल्हापूरचे श्री. बाबूराव जाधव आणि श्री. डी. बी. पाटील यांनी लाकडी बनावटीच्या रायफली तयार करून पुरवल्या. अहोरात्र दोन महिने लष्करी शिक्षण उत्तम प्रकारे चाललं होतं."

या कॅम्पची सरकारला बातमी लागली असल्याची सबळ शंका नागनाथ अण्णांना येताक्षणीच त्यानी या कोवळ्या कार्याचा चटकन नाश न व्हावा म्हणून दक्षता घेण्याचे ठरविले. या ठिकाणच्या कॅम्पची जागा बदलण्या-साठी दुसरी अन्य जागा शोधण्याचे काम पै. किसन अहीरवर सोपविले.

नागनाथ अण्णांची किसन अहीरवर फार मर्जी होती. अण्णांच्या घरा-शेजारी त्यांचं घर असल्यामुळे त्यांचा स्वभाव, वागणूक, काम यांचा पूर्ण परिचय होता. गरीब शेतकरी कुटुंबात किसनचा जन्म झाला होता. लिहिता-वाचता येईल येवढे शिक्षण झाले होते. बालपणापासून त्यांना खेळण्याचा छंद होता. खाणंपिणं, व्यायाम करणं, आखाड्यात कुस्ती खेळणं यामुळे त्यांचे शरीर भरदार व कमावलेले होते. ते फडावर एका लांगेवर तीन-तीन कुस्त्या करीत होते. वाळवे गावच्या लोकांनी त्यांच्या कुस्त्या पाहून सर्व गाव त्यांना खुराक व दुधासाठी म्हैस पुरवत होते. ते वाळवे गावचे नावाजलेले पैलवान, त्यांच्यामागे सर्व गाव असायचा. पंचक्रोशीत कुस्त्या करून त्यांनी गावचा नावलौकिक वाढवला होता. या निर्मळ मनाच्या, बेडर वृत्तीच्या, साहसी, शांत, सुस्वभावी व उमद्या तरुणाचा विवाह मिरजवाडीचे तुकाराम लक्ष्मण खोत यांची कन्या हौसाबाई हिच्याशी झाला. त्यांच्यापासून किसन अहीर यांना भगवान नावाच्या सुपुत्राचा लाभ झाला. तो सध्या किर्लोकरवाडीला काम करतो. नागनाथ अण्णांच्या फौजी संघटनेत किसन उत्तम प्रकारे नेतृत्व करीत होते. किसन अहीरनी शिराळा, पाटण, शाहूवाडी इथली सर्व जंगले पायाखाली घातली. कॅम्पची जागा शोधण्याची जबाबदारी त्यांच्यावर असल्याने त्यांनी दोन साथीदारांसह शाहूवाडी महालपैकी "थावड्या" जवळच सर्व दृष्टीने सोईचं म्हणून एक गाव पसंत केलं. हे हजार-बाराशे वस्तीचं गाव एका टेकडीवर "कानसा" नदीच्या काठावर वसलेलं आहे. वस्ती शेतकऱ्यांची आणि बारा बलुतेदारांची आहे. शेतकरी कष्टाळू आहेत. शेती अपुरी त्यामुळे कामधंद्यानिमित्त मुंबईला जाण्याचा प्रघात आहे. पवनाईचा डोंगर पूर्व-पश्चिम अर्धवर्तुळाकार पसरला आहे. उत्तर बाजूला सपाट मैदान हमचौक असून या मैदानाच्या पूर्वेस चोपडाईचा डोंगर दक्षिणोत्तर पसरला

आहे. दोन्ही डोंगर उजाड, वनस्पतीसुद्धा नाही. नाही म्हणायला एक आंब्याचे झाड छत्र चामर डुलल्याप्रमाणे दिसायचे. कांडववन नदीच्या खोऱ्यात साग, आंबा, जांभूळ, पळस अशा हिरव्यागार वृक्षराजींनं मैल न् मैल झाकून गेला आहे. पवनाई, चोपडाई, शिवराई आणि कांडववन यांच्या मध्यभागी पसरलेलं मैदान कॅम्पच्या दृष्टीने नैसर्गिक, सुरक्षित होतं. मैदानाच्या पूर्वेकडून उत्तरेकडे कानसा नदीला मिळणारा एक ओढा होता. पोलिसांची यदाकदाचित फौज आलीच तर सहजासहजी दिसण्यासारखं होतं. शिवाय इथं येणंही अवघड होतं. रस्ता नसल्याने दळणवळण सोपं नव्हतं.

क्रांतिकारकांना ही जागा पसंत पडली. ढगेवाडीचा कॅम्प हलवून 'थाबड्याच्या' मैदानात नेला. तिथं निर्धास्तपणे लष्करी शिक्षण चालू झालं. वाळवे व ऐतवडे गावाहून जेवण आणण्याची सोय करण्यात आली. थाबड्याच्या शेतकऱ्यांनी त्यांना स्वयंस्फूर्तीनं मदत करायला सुरुवात केली. त्यांना काही कळत नव्हतं; परंतु हे काम फार चांगलं आहे, गोरगरीबांसाठी आहे याबद्दल खात्री झाली. कॅम्पची माहिती कित्येक महिने बाहेरच्या जगाला मिळू शकली नाही. महंमद शरीफ म्हणाले, "मला असं म्हणायचं आहे की हे क्रांतिकारक लष्करी शिक्षणाव्यतिरिक्त दुसरं काम करीत होते काय ? याचा खुलासा मला कराल का ?"

महंमद शरीफ, तुम्ही विचारलेला खुलासा फार महत्त्वाचा आहे. हे लोक दुपारी बारा वाजेपर्यंत कॅम्पचं काम आटोपून, जेवण-खाण करून, शेजार-पाजारच्या खेड्या-पाड्यामधून गटगटाने जाऊन गावातल्या बातम्या काढणे, चांगल्या व टग्या माणसांची यादी तयार करणे, पाटील, तलाठी गावच्या लोकांशी कसे वागतात ती माहिती घेणे. टग्याला पकडून कॅम्पमध्ये आणून त्याला व्यवस्थित वागण्यास सूचित करणे, कुणा गरिबाची अन्यायाने कोणी टग्यानी जमीन बळकावली असल्यास ती परत द्यावयाला लावणे, त्याने तसे केले नाही तर त्याची धिंड काढली जात असे. गावगुंड, पाटील, तलाठ्याने गरिबांचे पैसे खाल्ले तर त्यांना पकडून चावडीपर्यंत नेऊन सर्वांदेखत पैसे परत द्यायला लावणे, कुणी अन्याय केला तर

फौजी संघटना ती दूर करीत असे. निष्पाप मुलींची नांदणूक लागली. विधवांना दिलासा मिळला. गावकऱ्यांना फौजी शिक्षण देऊन ब्रिटीशांची सत्ता नष्ट करण्याचे कार्य त्यांना साधायचं होतं. फौजी किसानांना खेड्याचा कारभार पहावयाचा होता. तालुक्याचा, जिल्ह्याचा संबंध तोडून शक्य होतील तितकी ग्रामराज्ये, प्रतिसरकार निर्माण करायचं होतं. हे कार्य नागनाथ अण्णांच्या आझाद हिंद फौजेने फार चांगल्या प्रकारे चालविलं होतं यात शंका नाही. हे कार्य बरेच दिवस चाललं असतं तर संपूर्ण भागात प्रतिसरकार ग्रामराज्ये सुरू झाली असती.

हा कॅम्प बिनधोकपणे दोन महिने चालू होता. परंतु ब्रिटीश सरकारचं गुप्तहेर खातं फार मोठं होतं. एके दिवशी सकाळी कवाईत चालू असताना पवनाईच्या माथ्यावर निरभ्र आकाशातील लहानशा ढगाप्रमाणे एक माणूस दिसून आला. दोन महिने इकडे एक चिटपाखरू दिसत नाही आणि आज एक माणूस पूर्व पश्चिम जाताना दिसला. काही सैनिकांना कूच करण्याचा हूकूम दिला. बरेच सैनिक धावत सुटले. तो दिशा बदलून दक्षिण दिशेने धावू लागला. तो एकसारखा हुकलावण्या देत होता. बंदुकीने त्याला टिपता येत होते, परंतु तो मेल्यावर माहिती काही मिळणार नाही म्हणून त्याला जिवंत पकडून कॅम्पमध्ये आणण्याचा आदेश होता. पाठलाग करून शेवटी त्याला पकडून आणला. क्रांतिकारकांनी त्याला जबर-दस्त मार दिला, त्यामुळे तो कबूल झाला की मी सी. आय. डी. आहे. सरकारला या कॅम्पची कुणकुण लागल्यामुळे सी. आय. डी. ला माहिती आणण्यासाठी त्याला पाठविले होते. या भागात तो निरनिराळ्या वेषात कॅम्पची प्रत्यक्ष माहिती मिळवण्यासाठी हिंडत होता.

काही लोकांनी त्याला नाबडतोब गोळी घालून ठार करण्याचा चंग बांधला. परंतु नागनाथ आदी प्रमुख क्रांतिकारक दारूगोळा, काडतूसे इत्यादी साहित्य मिळवण्यासाठी बरेच दिवस कॅम्पबाहेर पडले होते. ते परत येईपर्यंत त्याला जिवंत ठेवावा व ते आल्यानंतर नागनाथ अण्णा काय सांगतील त्याप्रमाणे करायचे ठरले. नागनाथ कधी येतात याचा नेम नव्हता व हा कदाचित काहीतरी हिकमत करून इथून निसटून गेला तर

काय ? हा धोका कसा पत्करायचा ? याला जिवंत ठेवायचे आणि पळून जाता येऊ नये म्हणून क्रांतिकारकांनी त्याला ओढ्यात गळ्याएवढा पांच फूट खोल खड्डा खणून पुरून ठेवला. जिवंत राहण्यापुरतं त्याला अन्नपाणी दिलं. पुढे दोनच दिवसांनी नागनाथ वगैरे मंडळी परत आली. सी. आय. डी. पकडल्याची व तो का आला होता याची सर्व कल्पना त्यांना दिली. सर्वांनी त्याची ओढ्यात जाऊन भेट घेतली. त्यानं जी हकीगत सांगितली ती ऐकून क्रांतिकारकांनी दिलेल्या माहितीशी बरोबर होती याची खात्री पटली.

सी. आय. डी. ने मला ठार मारू नका. घरी लहान मुलं-बाळं, वृद्ध आई-बाप, बायको आहे. माझ्याविना त्यांना कोणाचा आधार नाही. त्यांना निराधार करू नका. निव्वळ पोट जाळण्यासाठी मी हे नीचकृत्य केले मी देशद्रोही ठरलो. मला क्षमा करा व जिवंत सोडून द्या. मी ही माहिती कुठंही सांगणार नाही. देवा शपथ, मी हे खरं सांगतो आहे. असं गयावया करून अश्रू ढाळीत तो हात जोडून सर्वांना विनंती करीत होता. शरण आलेल्याला मारू नका असे काकूळतीने सांगत होता. सर्वांना त्याची दया आली. त्याला जीवदान द्यावयाचा निर्णय घेऊन जिवंत सोडून दिला. सर्वांनी त्याला दम भरला की "तुझी सर्व माहिती आम्हांला कळली आहे. तू इथली थोडीशी माहिती जर ब्रिटीश सरकारला दिलीस तर तुझ्या कुळाला दिवा सुद्धा ठेवणार नाही." तो सर्वांच्या पटापट पाया पडला. कॅम्प हालवेपर्यंत त्याला तिथंच कैद करून ठेवला. त्याचे डोळे बांधून त्याला घोड्यावर बसवून पूर्वेस वीस मैल अंतरावर सोडून दिला.

सर्पाला सर्वांनी दूध पाजून जिवंत सोडल्यासारखं तर झालं नाही ना ? या देशद्रोहीला सजा द्यायला हवी होती का ? हा 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' तरी होणार नाही ना ? हा सी. आय. डी. इथपर्यंत जंगल तुडवीत दोन तीन दिवस फिरतो आहे याचा अर्थ सरकारला आपल्या कॅम्पची कुणकुण लागली असावी, म्हणून तर हा इथपर्यंत आला होता. असे अनेक प्रश्न सर्वांच्या डोळ्यासमोर उभे राहिले. आता

इथं कॅम्प चालविणं धोक्याचं आहे, अन्यत्र कुठं तरी कॅम्प हलवणं जरुरीचं आहे असे सर्वांना वाटलं. जागा शोधण्यासाठी किसन अहीरनं सर्व भाग पायाखाली पालथा घातला होताच. त्यावेळी मणदूरची एक जागा पसंत पडली होती.

थावड्याहून कॅम्प हलविण्यापूर्वी किसन अहीरनं मणदूरच्या जंगलातील पसंत पडलेल्या जागेची पुन्हा एकवेळ पहाणी करावी व दुसरे दिवशी बारा एक वाजेपर्यंत कॅम्पवर परत यावं असं ठरलं. किसन अहीरने २३ फेब्रुवारी १९४६ ला पूर्वी त्याने पाहिलेली जागा परत एक वेळ सर्वत्र हिंडून पाहिली. यावेळी बारा वाजून गेले होते. थावड्याला त्याला एक वाजेपर्यंत परत यायचं होतं. मणदूर ओलांडून तो तीन–चार फर्लांग पुढे आल्यावर त्याच्या मनात पांडू मास्तरांचा विचार आला होता. पांडू मास्तरनी त्यावेळी काही दिवसांपूर्वी तुरुंग फोडून स्वतः सुटका करून घेतली होती. पोलिस त्यांच्या मागावर होते. त्यांना पकडण्यास ठिक-ठिकाणी छापे पडले होते. त्यांचा ससेमिरा चुकविण्यासाठी ते शिराळ पेठ्याच्या घनदाट अरण्यात यावयास निघाले होते. बरोबर दोन सहकारी होतेच. शिराळ्यापासून चार-पाच मैल चालून आल्यानंतर शिराळ्याच्या दिशेने एक सायकलस्वार गणवेशातील हत्यारी पोलिस त्यांना दिसला. पांडू मास्तर व दोन सहकाऱ्यांनी त्या पोलिसाला मोठ्या शिताफीने पकडून त्याच्याजवळची बंदूक काढून घेतली. त्याला परत लवकर जाता येऊ नये म्हणून सायकलची मोडतोड करून फेकून दिली. त्याला बेदम मारहाण केली. त्याचा ड्रेस फाडून टाकला व सोडून दिला. रक्तबंबाळ अवस्थेत, फाटक्या ड्रेसमध्ये तो पोलिस कसाबसा शिराळ्याच्या पोलिस ठाण्यावर आला आणि त्यांने सांगली, इस्लामपूर, सातारा, तासगाव या ठिकाणी वरीष्ठांना हकीगत कळवून जादा पोलिस दलाची मागणी केली.

माधवराव म्हणाले, "अहो साहेबजी, आपण किसन अहीर आणि आपला थावड्याचा कॅम्प हलविण्याबाबतची माहिती सांगत होता त्याचं काय झालं ?" साहेबजी म्हणाले, पांडू मास्तर व त्यांचे सहकारी कदाचित शिराळचे पोलिस आपल्या मागावर खात्रीने निघतील या शंकेने

मणदूरच्या रोखाने वेगाने निघाले. मणदूरच्या जवळपास आल्यावर योगायोगाने किसन अहीर व पांडू मास्तरांची गाठ पडली. पांडू मास्तरनी शिराळ्याजवळ पोलिसांची काय दशा केली ही हकीगत किसन अहीरला सांगितली.

कदाचित पोलिस माझ्या शोधात असतील, या बाजूने यायला निघाले असतील. तुम्ही आता पुढे जाऊ नका. संशयाने तुम्हाला पकडतील असे सांगून किसन अहिरला मागे वळविले आणि आपल्या बरोबर घेऊन मणदूरला गेले.

इकडे प्रचंड संख्येने पोलिसांच्या तुकड्या शिराळला वरीष्ठ अधिकाऱ्यांनी पाठविलेल्या. पोलिसाला मारहाण करणाऱ्या पांडू मास्तराचा पोलिसांनी माग काढला. पोलिस मणदूरपर्यंत येऊन थडकले. 'बंदुकधारी अशी माणसे गावात घुसली व गावच्या अमुक बाजूला निघून गेली' इथपर्यंत बातमी पोलिसांना मिळाली. मणदूर गावाला पोलिसांनी वेढा दिला आणि घर न् घर तपासलं. गावात भितीचे वातावरण पसरले. इकडे थावड्याच्या आझाद हिंद सेनेच्या फौजी संघटनेच्या कॅम्पवर चिंतेचे वातावरण पसरले होते. नागनाथ अण्णा व अंताजी पाटील काही कामासाठी चरणला गेले होते. दुसऱ्या दिवशी एक वाजेपर्यंत किसन अहीर परत आला नाही असं पाहून मधल्या पाय वाटेने किर्र जंगलामधून थावड्याच्या कॅम्पवरुन आणखी तीन क्रांतिकारकांना ज्ञानदेव नायकवडी, शामराव अप्पा, रामचंद्र अहीर यांना मणदूरकडे पाठविण्यात आले. काय गंभीर बाब असेल तर सत्वर कॅम्पकडे येण्याची सूचना दिली. सी. आय. डी. ला सोडून दिलेल्या दिवसापासून कॅम्पमधील लोकांची मने साशंक झाली होती. मणदूरच्या बाजूला किसन अहीरच्या बाबतीत काही दगाफटका तर घडलेला नसावा ? अशी रुखरुख सर्वांना लागून राहिली होती. त्यांच्या शोधार्थ पाठवलेले क्रांतिकारक मध्यरात्रीपर्यंत सुद्धा कॅम्पवर परतले नव्हते. जो गेला तो परत आला नाही. निश्चित काहीतरी दगा फटका असावा, धोका असावा अशी सर्वांची खात्री झाल्यावर पहाटे सर्व फौजी संघटनांनी हत्यारानिशी कूच करायचा निश्चय झाला रात्रभर सर्वांना झोप नव्हती.

पहाटे सेनानींनी आदेश दिला. लष्करी गणवेशामधील असंख्य फौजी सैनिक खांद्यावर बंदुका टाकून लेफ्ट-राईट करीत कदम कदम बढायेजा हे गीत खड्या सुरात गात मणदूरच्या दिशेने निघाले.

कित्येक मैल अशा प्रकारे कूच केल्यानंतर सूर्य उगविण्याच्या सुमारास सैनिक आरळ्याजवळ आले. पुढे ते मणदूरच्या मार्गाला लागले. मणदूर-कडून येणाऱ्या वाटसरूजवळ मणदूरच्या परिस्थितीची चौकशी करायला सुरुवात केली. तिकडून येणारा प्रत्येक माणूस सांगू लागला की सगळा मणदूर गाव रात्रीपासून फराऱ्यांना पकडण्याकरिता पोलिसांनी वेढला आहे. पोलिसांची फार मोठी संख्या आहे. दोन-चार फरारी पोलिसांच्या हाताला लागले आहेत. आणखी काही फरारींना पकडण्यासाठी सगळा गाव पोलिस शोधत आहेत.

किसन अहीर आणि त्यांच्या शोधार्थ गेलेले तीन क्रांतिकारक पोलिसांच्या हाताला लागले आहेत याबद्दलची शंका सैनिकांना मुळीच उरली नाही. सर्वांनी एकच निर्णय घेतला, की कितीही पोलिस असोत त्यांच्यावर कडाडून हल्ला चढवायचा आणि आपल्या कैद झालेल्या सहकाऱ्यांची सुटका करायची.

मानव विचार करतो वेगळा परंतु विधाता घडवत असतो वेगळंच. मणदूरात वेगळ्याच गोष्टी घडून गेल्या होत्या. किसन अहीर, पांडू मास्तर व त्यांचे सहकारी ज्या घरात झोपले होते त्या घरावर पहाटेच्या सुमारास घरच्या पुढच्या बाजूने छापा आला. घर म्हणजे एक भला मोठा वाडा होता. वाड्याचे तोंड पूर्वाभिमुखी होते. समोरून छापा आला त्यावेळी घरमालकाने त्या सर्वांना परसदाराने बाहेर काढले. अंधाराचा फायदा घेऊन हे चौघेजण प्रातर्विधी करायला निघाल्याचे भासवून ते मणदूच्या बाहेर पडले व मणदूरच्या पश्चिमेस पेटलोंचा रस्ता आक्रमण करू लागले. मात्र किसन अहीरच्या शोधासाठी आलेले तीन क्रांतिकारक मणदूरच्या पोलि-सांच्या हाती लागले होते. पोलिस त्यांना पकडून पांडू मास्तर व त्यांचे सहकारी पकडण्यासाठी सगळा मणदूर गाव पालथा घालीत होते.

पांडू मास्तर, त्यांचे साथीदार व किसन अहीर मणदूर सोडून थोडेसं आले असतील इतक्यात मणदूरकडून येणाऱ्या काही वाटसरूंनी त्यांना सांगितले की, पोलिसांनी मध्यरात्रीच्या सुमारास मणदूरात तिघा फराऱ्यांना अटक केली आहे. किसन अहीरना शंका आली हे फरारी म्हणजे आपले लोक असायला पाहिजेत. आपण सांगितलेल्या वेळी 'थाबड्यास' परत गेले नाही त्यामुळे आपल्या शोधार्थ पाठविलेले सहकारी अवधान न राहिल्याने सापडले. त्यांचे मन पुढे धजवेना ते परत मणदूर-कडे वळले. गावाजवळ आले त्यावेळी सूर्य उगवला होता. सगळा मणदूर पोलिसांची छावणी झाली होती. घरा-घराला पोलिस उभा होता. आपल्या कॅम्पची कल्पना त्यांच्या कानावर गेली असावी म्हणून एवढ्या मोठ्या संख्येने पोलिस आणले असावेत अशी शंका किसन अहीराच्या मनात आली ! आपल्या सहकाऱ्यांना पोलिस छळतील, त्रास देतील, मारहाण करतील, कॅम्पची बातमी काढतील, कॅम्पची वाताहत करतील, फौजी संघटना कदाचित इकडे येईल मग पोलिस व आपल्या फौजी संघटनेचा घोर संग्राम चालू होईल असे किसन अहीरना वाटत होते.

इतक्यात एका वाटसरूनं किसन अहीरला सांगितलं की, "शितूरच्या जंगलामंदी मायंदाळ 'फरारी' आल्यात." किसन अहीरला हिमालयासारखा आधार वाटला. ती जागा पूर्वी रामचंद्र अहीर व अंताजी पाटील याना माहित होती. मी निवडलेल्या ठिकाणी कॅम्प आल्याचे त्याला समाधान वाटले. त्या रोखाने ते निघाले. इकडे मणदूरमध्ये रामचंद्र अहीर व दोन साथीदारांना किसन अहीरांच्या शोधार्थ पाठवलेल्या सहकाऱ्यांना अटक करून ठेवले होते याची कल्पना त्यांना नव्हती.

किसन अहीर शितूरच्या जंगलात जात असताना त्याना एका धूर्त पोलिसानं पाहिलं होतं. पांडू मास्तरच असावेत अशी त्याला शंका आली. पांडू मास्तरांच्यावर सर्व पोलिसांचा दात होता. ते तर पेटलोंडच्या बाजूला निघून गेले होते.

सर्व पोलिस मणदूरचा छापा उठवून किसन अहीरचा मार्ग काढीत मधल्या पायवाटेने निघाले. अटक केलेल्या तीन सहकाऱ्यांना बरोबर घेतले

होतेच. किसन अहीर कॅम्पमध्ये पोहचले होते. त्यानी थाबड्यास परत वेळेवर एक वाजेपर्यंत न येण्याची घटना सांगितली. मणदूरच्या वेढ्यामधून कसे बाहेर पडलो हे सांगितले. माझ्या या एका चुकीमुळे सध्या आपले तीन सहकारी पोलिसांच्या हाती लागले आहेत हे त्याना खटकत होते. यांची सुटका केल्याशिवाय इलाजच नाही. यासाठी पोलिसांच्या बरोबर संग्राम करावा लागणार. मोठा बाका प्रसंग आला होता.

नागनाथ अण्णा यावेळी इथं हजर नव्हते. ते आपले दोन साथीदार घेऊन बाबुराव चरणकर व गणपतराव पाटील यांच्याकडे काही शस्त्रास्त्रं आणण्यासाठी चरणला गेले होते. त्यांना बोलावण्यासाठी एक सैनिक पाठवला होता. ते सर्वजण कॅम्पमध्ये येऊन दाखल झाले होते.

सर्व क्रांतिकारकांनी तीन साथीदारांची सुटका करण्यासाठी पोलिसांवर हल्ला चढवायचा धोका पत्करला. यामध्ये कितीही नुकसान, प्राणहानी होईल याची परवा करायची नाही असा निर्णय घेऊन जयहिंदचा जय-घोष करून ओढ्याच्या काठावर आले. तोच पोलिस दुसऱ्या बाजुने ओढ्या-पर्यंत लपत छपत येत असल्याचे दिसून आले. एवढ्या मोठ्या संख्येने सशस्त्र क्रांतिकारक आणि दोन शीख फौजी सेनानी पाहून पोलिसांचे धाबे दणाणले. त्यांना वाटलं आता आपली धडगत नाही. आपण जिवंत घरी परत जातो का नाही याची शंका वाटू लागली. मागं फिरावं तर मरण, पुढं जावं तर मरण. मरणाच्या जाळ्यात सापडलो. आता इलाज नव्हता. प्रथम दर्शनीच त्यांचा धीर खचला होता. संग्रामात धीर खचला की पराभव अटळ असतो.

लष्करी सेनानींनी फौजी संघटनेला फायरचा हुकूम दिला. त्याबरोबर 'जयहिंद' 'भारत माता की जय'च्या आरोळ्यांनिशी आकाशात फैरी झाडल्या गेल्या. पोटासाठी लढणारे पगारी पोलिस आणि देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढणारे क्रांतिवीर यांच्यामध्ये हा अभूतपूर्व 'जीवन संग्राम' जीवनामधला स्वातंत्र्यासाठी जीवाचा संग्राम चालू झाला. इस्लामपूर, तासगाव इत्यादी ठिकाणचा निशस्त्र लाखोजन समुदाय पोलिसांनी दहा-वीस बंदुकीच्या बळावर वारेमाप उधळून लावला होता. परंतु आता या

चार-पाचशे सशस्त्र क्रांतिवीरांना पिटाळून लावणं अशक्य होतं. आता आपल्यालाच पळून जाण्याची वेळ येणार आहे. स्वातंत्र्यानं वेडे झालेले लष्करी शिक्षण घेतलेले व देशासाठी बळी जाणारे सैनिक आपला पिट्टा पाडल्याशिवाय राहणार नाहीत, यांच्यावर गोळीबार करून आपण देश-द्रोही बनणार याची जाणीव त्यांना होती. तरीपण त्यांनी फायरला सुरवात केली. ओढ्याच्या उंच काठावरून स्वातंत्र्यसैनिकांचा ओढ्या-मधील पोलिसांवर बरोबर नेम लागायला निसर्गदेवीची मदत झाली. दोन्ही बाजुकडून एकसारखा गोळीबार चालू होता. काही पोलिस जखमी झाल्याने त्यांचा धीर खचला. शितूरच्या जंगलाला छोट्याश्या लढाईचं स्वरूप प्राप्त झालं होतं. पोलिस पळ काढण्याच्या मार्गावर होते. चरणहून नागनाथ अण्णा, (राजमती पाटील ताई), अंताजी पाटील, वाय. सी. पाटील, बाळकू बिरनाळे इत्यादि क्रांतिवीर काही बंदुका, काडतुसे आणि सैनिक घेऊन फौजेमध्ये आले होतेच. याची बातमी पोलिस प्रमुखास लागली. आपण नागनाथांच्या कचाट्यात सापडल्यावर धडगत होणार नाही व फार मोठा अनर्थ होईल हे ओळखून काही पोलिसांनी जखमीना लॉरीकडे नेण्यास सुरवात केली. पोलिस पळ काढू लागले आहेत, जखमीना उच-लायला लागलेत, त्यांचा पराभव झाला, 'आपला विजय झाला' या आनंदाच्या भरात किसन अहीर लाईंग पोझिशन, सोडून सिटींग पोझि· शनने गोळीबार करता क्षणीच त्यांच्या गुढघ्याला एक गोळी लागली व गुढघ्याची वाटी निघाली. एकच शीर राहिली होती. भयंकर रक्तस्त्राव सुरू झाला. हा रक्तस्त्राव थांबवण्यासाठी नानकसिंग सेनानींनी किसन अहीरच्या हृदयाकडच्या बाजूस मांडीला आवळून बांधत असताना दुसरी एक गोळी नानकसिंगाच्या मस्तकाला लागली. नानकसिंग आणि किसन अहीर दोघेही जमिनीवर कोसळले ! नानकसिंगाचा प्राण तात्काळ पंचत्वात विलीन झाला. आपले दोन प्रमुख पडल्यावर क्रांतिवीराना भयंकर दुःख झाले. त्यांनी गोळ्यांचा वर्षाव चालू केला. पोलिस सत्वर पळ काढून लॉरीमध्ये बसले आणि लॉऱ्या शिराळा मार्गाने भरधाव निघून गेल्या. या धूमश्चक्रीमध्ये बेड्या घालून अटक केलेले त्यांचे तीन सहकारी ज्यांना

सोडवण्यासाठी त्यांनी गोळीबार केला होता. त्यांना तिथंच सोडून पोलिस निघून गेले होते. त्या तीन क्रांतिकारकांना जिवंत पाहून त्यांना अत्यानंद झाला. त्यांच्या बेड्या फोडून काढून त्यांची सुटका केली.

क्रांतिकारकांचा विजय झाला खरा; पण नानकसिंग तात्काळ परण पावले. किसन अहिरांचा रक्तस्राव थांबला नाही. ते बेशुद्ध अवस्थेत होते. त्यांचा प्राण गोळा होत चालला होता. ते नागनाथ अण्णांना काहीतरी सांगणार होते. परंतु नागनाथ अण्णा जवळ येण्यापूर्वीच काही वेळात त्यांचा प्राण कुडीतून निघून गेला होता. नागनाथ अण्णा जवळ जाऊन पाहतात तो किसन अहिर व नानकसिंग 'हुतात्मा' झाल्याचे दिसून आले. तीन सहकारी सोडून पोलिस पसार झाले होते. तिघांना सोडवण्यासाठी दोघांना बळी जावं लागलं त्याबद्दल त्यांना अतिशय खेद वाटला. सर्व महाराष्ट्रभर त्याचे पडसाद उमटले. पोलिस खात्यात ब्रिटीश सरकारला या फौजी संघटनेची फार मोठी दहशत बसली. इग्रजांना पुन्हा या जंगलात येण्याचे धैर्य झाले नाही. सैनिकांनी त्यांच्या पार्थिव देहांना शितूरच्या जंगलात फौजी थाटात सलामी दिली. बंदुकीच्या सव्वीस फैरी झाडून दहनविधी उरकण्यात आला. त्यांची रक्षा वाळव्याच्या कृष्णामाई नदीत सोडण्यांत आली. नानकसिंग बिचारे जगात एकटेच होते. परंतु किसन अहिरना पत्नी हौसाबाई व एक भगवान नावाचा मुलगा होता त्यांची सर्व जबाबदारी अण्णानी पाहिली. पत्नी कर्क रोगाने मरण पावल्या, भगवानला अण्णांनी कामावर लावले. माधवराव व महंमद शरीफ हे दोघे या संग्रामाची माहिती सांगत असताना अगदी श्वास रोखून उत्सुकतेने ऐकत होते. त्यांच्या मुखावर दुःखाची छटा पसरली होती. त्यांच्याही डोळ्यांमधून नकळत दुःखाश्रू वाहत होते याचे त्यांना भान उरले नाही. दोघांनी वाहिलेली ही नैसर्गिक श्रद्धांजलीच म्हणायची. रुमालाने डोळे पुसत महंमद शरीफ सनदे म्हणाले, "नागनाथ अण्णा तुमचे जिवलग वर्गमित्र तुम्ही त्यांच्या सतत सहवासात असून कधी एक अवाक्षरसुद्धा या पाचपंचवीस वर्षात आम्हाला सांगितलं नव्हतं. अण्णांच्या या बऱ्याचश्या एकापेक्षा एक महान घटना सांगून आम्हाला आश्चर्यचकित करून सोडलं.

त्यांची ही अमोल माहिती भावी पिढीला अती मोलाची आहे. देशासाठी त्यांनी केलेले कार्य प्रत्येक तरुणाला मार्गदर्शन केल्याशिवाय राहणार नाही. सुभाषबाबूंच्या प्रमाणे काम करणारा आपला हिमालयासारखा मित्र पाहून अत्यानंद होतो. अभिमानानं छाती भरून येते. केवढं मोठं भाग्य आपलं ! या दोन हुतात्म्यांच्या नावाने अण्णांनी नानकसिंगाच्या नावाने वाळव्यास वसतीगृह सुरू केलं व किसन अहिरच्या नावाने विद्यालय चालू केलं आणि आज त्यांच्याच नावाने साखर कारखाना सुरू करून गरीबांच कोट कल्याण करत आहेत. नागनाथ अण्णांनी स्वातंत्र्याची किंमत फार चांगल्या प्रकारे समजली आहे, यात शंका नाही. म्हणूनच त्यांनी फौजी संघटना उभारली होती."

भारतात अनेक जाती–धर्माचे लोक आहेत. ते आपआपल्या धर्माप्रमाणे देवाची पूजा-अर्चा करतात, भक्ती करतात. परंतु ती भक्ती एकाच देवाला पोहोचते. तद्वत भारतामधील अनेक लोकांनी स्वातंत्र्यदेवतेच्या प्राप्तीसाठी वेगवेगळ्या मार्गांचा अवलंब केला. काहींनी शस्त्रांनी तर काहींनी निःशस्त्रांनी लढा दिला. परंतु सर्वांचे उद्दिष्ट एकच— "स्वातंत्र्य प्राप्ती."

स्वातंत्र्याची किंमत प्रत्येक जीव-जंतू, प्राणी, वनस्पतींनासुद्धा प्राणापेक्षा प्रिय वाटते. डॉ० झाकीर हुसेन यांची एक गोष्ट या प्रसंगी मला आठवली, ती मी तुम्हाला थोडक्यात सांगूनच आपल्या गप्पा-गोष्टी, चर्चा बंद करणार आहे. हे दोघे गोष्ट ऐकण्यास अधीर झाले होते. त्यांनी सांगण्याचा आग्रह केला. राष्ट्रभाषा हिंदीमध्ये आपल्या भारतीय लोकांच्यामध्ये राष्ट्रीय भावना जागृत होण्याच्या दृष्टीने फार मोठे विपुल साहित्य हिंदी साहित्यिकांनी लिहिले आहे. मी हिंदीचे वर्ग अनेक वर्षे चालवित होतो. हिंदी साहित्याचे महान विद्वान डॉ० झाकीर हुसेन यांची एक अतिउत्तम गोष्ट मी मराठी भाषेत थोडक्यात सांगणार आहे. अशा साहित्याचा हिंदी लोकांना खरा उपयोग आहे.

हिमालयाच्या पायथ्याला अलमोडा गाव आहे. तिथं अबु खाँ मियाँ गावाच्या बाहेर रहात होते. जगात ते बिचारे एकटेच होते. त्यांना शेळ्या

पाळण्याचा नाद होता. त्यांच्या दोन-तीन शेळ्या हिमालयाच्या जंगलात लांडग्याने खाऊन टाकल्या होत्या, म्हणून त्यांनी एक लहान शेळीचे कोकरू पाळले होते. आपल्यात मिळून-मिसळून एकरूप होऊन राहील असे त्याना वाटले. ते कोकरू मोठे झाले. पांढऱ्या शुभ्र रंगाचे असल्याने तिचं नाव 'चांदणी' ठेवलं. चांदणी शेळी व्याली, दूध देऊ लागली. तिला तो सोन्याचा घास खाऊ घालत असे. परंतु तिच्या गळ्यात रात्रं-दिवस दोरीचे बंधन होते. ती बेऽऽ बेऽऽ करून ओरडायची. त्यामुळे अबु खाँने तिला घरासमोरच्या मोठ्या जागेत काटेरी कुंपण करून मधोमध लांब दोरीने बांधून टाकले. तरीपण हिमालयाच्या जंगलाकडे तोंड करून बेऽऽ बेऽऽ ओरडायची. खायची नाही, दूध कमी आलं. मियाँनी ओळखलं की हिलासुद्धा स्वातंत्र्य हवं होतं. तेव्हा रागारागांने तिला चार-पाचच्या सुमारास त्यांनी तिला खोलीत कोंडली, व दाराला कडी लावली. परंतु मागील खिडकीचे दार लावण्यास ते विसरले. ती चांदणी खिडकीमधून उडी मारून हिमालयाच्या जंगलात पळून गेली. तिथं ती स्वातंत्र्याचा यथेच्छ व मनमुराद आनंद उपभोगू लागली.

संध्याकाळी सूर्य मावळला, प्राणी पक्षी, गुराखी, मेंढपाळ घरी परतू लागले. तिच्या काही अंतरावरून एक मेंढपाळ शेळ्या-मेंढ्या घेऊन घरी चालला होता. त्यामधील एका बकऱ्याची नजर चांदणीवर पडली. तो तिच्याकडे कळपामधून निघून आला. ते दोघे झाडीत, गवतात, हिंडले, फिरले. खुप प्रेम व सुख भोगलं. शेवटी तो बकरा आपल्या लांब गेलेल्या कळपात पळत जाऊन मिसळला. परंतु चांदणी गेली नाही. अब्बु खाँ मियाँचा खालून बोलावण्याचा आवाज येत होता. "चांदणी वापस आ! वहाँ भेडियाँ रहता है। वह खा लेगा।" तिला लांडग्यांची भिती असून सुद्धा ती गेली नाही. लांडग्यांबरोबर संग्राम करण्याची तिची तयारी होती. तो ऐकणार नाही हेही तिला माहित होतं.

थोडा अंधार पडला, लांडग्याचे डोळे चमकलेले तिने पाहिले. खूँ खूँ करीत तो पुढे चाल करत आहे. तीही आपले शिंग सावरून पवित्र्यात उभी राहिली. लांडग्याने तिच्यावर चाल केली. ती तीक्ष्ण शिंगाने त्याला

मार देत होती. रात्रभर दोघांची झटपट चालू होती. लांडग्यास एक-दोन वेळा खाली पाडून शिंगाने घोळसले होते. लांडगा जबरदस्त होता खरा. पण चांदणीनेही त्याला शिंगाने जबरदस्त मार दिला होता. तिचे पांढरेशुभ्र शरीर रक्ताने लालभडक झाले होते. आता ती खूप दमली होती. सकाळचे सहा वाजले होते. पायथ्याखालून मशिदीतून प्रार्थनेचा आवाज तिने ऐकला. शेवटी लांडग्याने तिला रेटत नेऊन खाली पाडली व खाऊन टाकले. यावेळी झाडावर बसलेल्या चिमणीने हा जिवंत जीवन संग्राम पाहिला होता. ती म्हणाली 'चांदणी जीती' डॉ. झाकिर हुसेन यानी या गोष्टीत सांगितले आहे की "वह अपनी आझादी किन्ही दामों देनेसे राजी न हुअी." स्वातंत्र्याची किंमत स्वर्गापेक्षाही श्रेष्ठ आहे.

यावरून दिसून येईल की मुक्या प्राण्यांना सुद्धा स्वातंत्र्याची किंमत प्राणापेक्षा प्रिय वाटते. स्वातंत्र्याची किंमत जगात कुणालाच करता येत नाही, स्वातंत्र्यास्तव प्राण समर्पण करणाऱ्या वीरांस मोक्ष प्राप्ती होते. प्रत्येक मनुष्य शेवटी आपल्याला मोक्ष मिळावा म्हणून पुण्यकर्म करण्याची धडपड करीत असतो. तरीपण हा मोक्ष सहजासहजी कुणाला मिळत नाही. यासाठी पुण्यकर्म किंवा हुतात्मा बनावं लागतं.

माधवराव व महंमद शरीफ म्हणाले, " तुम्ही याला अनुसरून मोठी मार्मिक व स्वातंत्र्यानं ओथंबलेली गोष्ट सांगितली. किसन अहिर व ना. अण्णांचा किती घनिष्ठ संबंध होता हे आम्हाला चांगले कळले." अण्णाना स्वातंत्र्य आणि हुतात्मा यांची किंमत जगात सर्वश्रेष्ठ आहे हे चांगल्या प्रकारे समजले असल्याने त्यांनी कारखान्यास गरीब शेतकरी कुटुंबात जन्मलेल्या व्यक्तीचं नाव हु. कि. अहिराचं नाव देवून जगात एक महान आदर्श निर्माण केला असल्याचे स्पष्ट दिसून येईल.

माधवराव म्हणाले, "साहेबजी ! भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर या क्रांतिवीरांचे गावोगाव लोक सत्कार समारंभ करत होते. एकशे एक बैलजोड्यांच्या गाडीमधून गावात त्यांची मिरवणूक काढली जात होती. अशा वेळी क्रांतिवीर नागनाथ अण्णाना आपल्या सरकारनं का अटक केली

होती ? याचा उलगडा अद्याप आम्हाला झाला नाही. तरी हे गौड-बंगाल (गुप्त रहस्य) काय आहे हे कृपा करून सांगा !" साहेबजी म्हणाले, ४२ सालचा संग्राम म्हणजे सशस्त्र व निःशस्त्र असा लढा होता. १५ ऑगस्ट हा दिवस भारताच्या इतिहासात सुवर्ण अक्षरांनी लिहीला गेला यात नवल नाही. भारतामधील सजीव-निर्जीव वस्तू आनंदाने नाचू लागल्या लागली. क्रांतिवीर स्वातंत्र्यसैनिकाना तर स्वर्गीय आनंद होणं साहजिक आहे. त्यांच्या कार्याचं, जीवनाचं सार्थक झालं होतं यात शंका नाही ! महात्मा गांधींचं स्वातंत्र्याचं स्वप्न साकार झालं होतं !

भारतावर आपले लोक आता राज्य करू लागले. क्रांतिवीर, स्वातंत्र्य-सैनिक यांच्यावर इंग्रज सरकारने खटले भरलेले होते. वॉरंट काढलेली होती. अनेक वीर कारागृहात होते. त्यांची आता आपल्या सरकारने बिनशर्त सुटका केली होती. खटले, वॉरंट काढून टाकली होती. त्यामुळे या वीरांना जगात आता मान ताठ करून, उजळ माथ्याने फिरायला कुणा-चीच भीती राहिलेली नव्हती."

स्वातंत्र्याचा लढा म्हटल्यावर या क्रांतिवीरांच्याकडे शस्त्रास्त्रं असणं साहजिक आहे. शस्त्राविना लढाच होऊ शकत नाही. देश स्वतंत्र झाल्या-वर या शस्त्रांचा दुरूपयोग होऊ नये; कदाचित हे आपआपसात भांडण-तंटा करताल म्हणून ही शस्त्रे शासनानं सरकारजमा करण्याचा आदेश दिला. त्याप्रमाणे या क्रांतिवीर स्वातंत्र्यसैनिकांनी ही शस्त्रे ज्यांची आणली होती त्यांना परत दिली आणि राहिलेली सर्व शस्त्रे सरकारकडे देऊन टाकली.

त्या वेळचे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री व क्रांतिवीर नागनाथ अण्णा यांचे या बाबतीत काही तात्विक भांडण, मतभेद झाले होते. नागनाथ अण्णां-च्याबद्दल त्यांच्या मनात आकस निर्माण झाला होता. त्यावेळी नागनाथ अण्णानी त्यांना खणखणीत उत्तर दिले होते की, "माझ्यावर तुम्ही कुठल्याही प्रकारचा दबाव आणू नये. वेळ पडल्यास मी शासनाबरोबर सुद्धा निःशस्त्र व अहिंसात्मक लढा द्यायला तयार आहे ! तुम्ही सत्तेनं मदांध होऊ नका !" हा स्पष्टवक्तेपणा त्यांना झोंबला होता, खटकला

होता. कदाचित हा वीर आपल्याला सत्तेवरून सुद्धा खाली खेचायला कमी करणार नाही असे त्याना वाटले असावे! 'ज्यांच्या हाती सत्ता तो पारधी' सरकारने त्यांना पकडण्याचा आदेश दिला व पकड-वॉरंट सोडले. ज्या क्रांतिवीराने देश स्वतंत्र करण्यासाठी प्राणाची पर्वा केली नाही, फौजी संघटना स्थापून इंग्रजांच्या बरोबर जिथं-तिथं घोर संग्राम दिला, प्रति-सरकार स्थापन केले. गुंडांचा नायनाट करून इंग्रजांना त्राही भगवान करून सोडले; असा दुहेरी लढा दिला. त्याना पकडण्याचा आदेश म्हणजे त्यांच्या कार्याचा, स्वातंत्र्याचा व पर्यायाने राष्ट्राचा अपमान म्हणता येईल! सत्तेपुढे शहाणपणा चालत नाही असं त्याना वाटलं असावं! हम करे सो कायदा हा कुठला न्याय? ज्यांनी बेचाळीस सालच्या संग्रामास कधीच प्रत्यक्ष भाग घेतला नाही, इंग्रजांची सेवा करण्यामध्ये ज्यानी सर्व आयुष्यखर्ची घातलं त्याना अशा देशभक्त वीरांची कदर काय असणार?

क्रांतिवीर नागनाथ अण्णाना सन १९४८ साली किर्लोस्करवाडी येथे अटक करून त्याना सांगली जेलमध्ये ठेवण्यात आले. त्यांच्यावर सांगली कोर्टात खटला चालू झाला. न्यायाधिशाने त्यांना सांगली, सातारा व पुणे हे तीन जिल्हे सोडून देणे व हद्दपार त्यांना त्या ठिकाणी बेमुदत अटक अशी शिक्षा सुनावली गेली. त्यावेळी नागनाथ अण्णांच्या बाजूने साताराचे प्रसिद्ध वकील श्री. व्ही. एन. पाटील, श्री. संतराम पाटील, श्री. देशमुख यांनी सहाय्य केले पण उपयोग झाला नाही. नागनाथ अण्णांची ही बातमी महाराष्ट्रात सर्वत्र वाऱ्यासारखी पसरली गेली. खेड्यापाड्यामधील सर्व तरुणवर्ग, सहकारी, स्वातंत्र्यसैनिक यांच्या तळपायाची आग मस्तकात जाऊन भिडली. पंधरा-वीस हजार जवान पायी चालत सांगलीच्या कलेक्टर कचेरीवर मोर्चा घेऊन आले. नागनाथ अण्णांच्यासाठी (त्यांच्यावरील अन्याय दूर करण्यासाठी) प्रत्येकजण मरायला तयार झाला होता. त्यांनी नागनाथ अण्णाना बिनशर्त व ताबडतोब सोडा असे कलेक्टरना खड्या आवाजात सांगितले! नागनाथ अण्णा झिंदाबादच्या आरोळ्यानी आकाश दुमदुमून गेले होते. आम्ही अण्णांसाठी मरू परंतु मागे हटणार नाही असे खडसावून सांगितले. त्याना जर सरकारनं ताबडतोब सोडलं नाही

तर उद्या परवा आणखी एक दोन लाख जनतेचा मोर्चा चाल करून येणार असल्याचे निवेदन कलेक्टरना सादर केले.

नागनाथ अण्णांसाठी मरणालाही न भिणारे तरुण जवान पाहून कलेक्टर साहेबांच्या काळजात धस्स झाले! काळीज धडधडू लागलं! साहेब बेचैन झाले!! काय करावं सुचेना! त्यांनी ही भयानक परिस्थिती पाहून मुख्यमंत्र्याना मुंबईस फोन केला आणि इथल्या परिस्थितीचे वर्णन फोनवरून कळवलं. हा मोर्चा आटोक्यात येणं शक्य नाही. काही क्षणाचा विलंब केला तर धोका होण्याचा संभव आहे. नागनाथांना जर यावेळी ताबडतोब बिनशर्त सोडलं नाही, तर एक दोन दिवसात पुन्हा एक-दोन लाख लोकांचा मोर्चा येणार असल्याचे निवेदन केले.' तेव्हा काय करायचं याचा निर्णय फोनवरून सत्वर कळवा. मिलिटरीचा सुद्धा तिथं काही उपयोग होणार नाही, काही चालणार नाही. असं अधिक स्पष्टीकरण कलेक्टर साहेबानी केलं.

मुख्यमंत्र्यानी कलेक्टर साहेबाना सांगितलं-फोनवरूनच कळवलं की, क्रांतिवीर नागनाथ अण्णांची बिनशर्त ताबडतोब सुटका करावी आणि त्यांना न्यायाधिशांनी दिलेली शिक्षा कायमची रद्द करण्यात यावी.

असा फोन आल्याबरोबर नागनाथ अण्णांची जेलमधून ताबडतोब सुटका करण्यात आली. दिलेल्या शिक्षेचा आदेश रद्द केल्याचे जाहीर करताक्षणीच नागनाथ अण्णांचा विजय असो! अण्णा अमर आहेत! नागनाथ अण्णा झिंदाबाद! अशा गर्जना करीत सर्व सांगली शहरामधून मिरवणूक काढण्यात आली. अशा प्रकारे त्यांच्या देश सेवेच्या कार्याची पावती जनतेनं शासनाचे हाती दिली म्हणायची. अशा प्रकारे नागनाथ अण्णांनी आपल्या सरकारला सुद्धा नमतं घ्यावयास लागलं! याला म्हणतात क्रांतिवीर नागनाथ रामचंद्र नायकवडी!" महंमद शरीफ म्हणाले, क्रांतिवीर नागनाथ अण्णांमध्ये हिमालयाप्रमाणे आलेली संकटे सहजासहजी नाहीशी करण्याची अगाध शक्ती आहे खरी! आझाद हिंद सेनेच्या फौजी संघटनेचा हा महाराष्ट्रातील शिरोमणी, याला भारतात तोड नाही. असले क्रांतिवीर देशाचा कारभार उत्तम रीतिने करू शकतील,

देश उन्नतीच्या शिखरावर नेऊ शकतील असे मला वाटते. परंतु असले वीर सत्तेच्या पाठीमागे लागत नाहीत. नैसर्गिक शक्ती, युक्ती, संपत्ती, समता, बंधुप्रेम त्यांच्या चरणावर लोळण घेत असतात. मग सत्तेची हाव कशाला? क्रांतिवीर नागनाथ अण्णांच्या या कार्याचा सूर्यासारखा प्रखर प्रकाश अधिकच वाढत गेला आहे हे मी प्रत्यक्ष डोळ्याने पहातो आहे. धन्य ! धन्य ! नागनाथ अण्णा ! आपण मुलामध्ये मूल, फुलामध्ये फूल, तरुणामध्ये तरुण, वृद्धामध्ये वृद्ध, ज्ञानी, वीरामध्ये महावीर, अन्याया विरुद्ध बंड असा आपला लौकिक सर्वत्र पसरलेला पहावयास मिळतो. आपलं हृदय मेणाहून मऊ व वज्राहून कठोर आहे हे कुणालाही नाकारता येणार नाही."

या स्वातंत्र्याच्या काळात नागनाथ अण्णानी सहकारी क्षेत्रात क्रांती करून अवघ्या सात-आठ महिन्यात हा साखर कारखाना करण्याचा भारतात विक्रम स्थापन केला आहे. किसन अहिर हुतात्म्याच्या पुण्याईने गरीब शेतकऱ्यांचं कंट-कल्याण होणार आहे.

हा कारखाना पाहून किसन अहिरना स्वर्गामध्ये किती आनंद होत असेल. शेतकऱ्यांच्या ऊसा ऊसात आणि साखरेच्या कणा कणात किसन अहिरचा आत्मा भरलेला आहे. त्याचा वरदहस्त सतत या कारखान्यावर राहील यात शंका नाही. "हुतात्मा साखर" खाणाऱ्यास ही मोक्षप्रद साखर अत्यानंद दिल्याशिवाय राहणार नाही. नागनाथ अण्णांनी अशा प्रकारे हिमालयासारखं अभूतपूर्व, नाविन्यपूर्ण, नवचैतन्य निर्माण करण्यासं कार्य करून या सहकार क्षेत्रात क्रांती निर्माण केली आहे! असली अनेक कामं करण्यासाठी त्यांना दीर्घायुष्य लाभो! हीच प्रभु चरणी सर्व स्वातंत्र्य-सैनिक अन् बहुजन समाजाची अपेक्षा आहे.

हा आमचा हिमालय (नागनाथ अण्णा) सर्वांना दिनकर कवीचा एक संदेश देत आहे.

खडा हिमालय बता रहा है, डरो न आँधी-पानीसे
खडे रहो अपने पथपर, लाख मुसीबत आने से ॥

समाप्त